# TIMOTHEUS AND PHILEMON.

OR

# THE STORY OF TWO CHRISTIAN BROTHERS.

**(TRANSLATED INTO MARATHI.)**

BY

THE Rev. APPAJI BAPUJI C. M. S,

SOCIETY FOR PROMOTING CHRISTIAN KNOWLEDGE.



# तिमथ्यस आणि फिलेमोन.

अथवा

# एका ख्रिस्ती जुवळाची गोष्ट.

याचें भाषांतर

**रेवरेंड आपाजी बापूजी नीसबत चर्चमिशन**

यांनीं केलें

तें

**ख्रिस्तीज्ञानप्रसारकसभा इजकरितां**

**मुंबईमध्यें**

" निर्णयसागर " छापखान्यांत छापिलें.

सन १८८२.

# TIMOTHEUS AND PHILEMON.

OR

# THE STORY OF TWO CHRISTIAN BROTHERS.

**(TRANSLATED INTO MARATHI.)**

BY

THE Rev. APPAJI BAPUJI C. M. S,

SOCIETY FOR PROMOTING CHRISTIAN KNOWLEDGE.

# तिमथ्यस आणि फिलेमोन.

अथवा

# एका ख्रिस्ती जुवळाची गोष्ट.

याचें भाषांतर

रेवरेंड आपाजी बापूजी नीसबत चर्चमिशन

यांनीं केलें

तें

ख्रिस्तीज्ञानप्रसारकसभा इजकरितां

मुंबईमध्यें

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

सन १८८२.

# एका ख्रिस्ती जुवळाची गोष्ट.

## प्रकरण १.

### आई आणि बाप.

लक्षांत ठेवण्याजोग्या आणि उपदेशपर अशा गोष्टी इतिहासांत पुष्कळ आढळतात. त्यांपैकींच तुर्की व ख्रिस्ती लोक यांमध्यें झालेल्या लढाया होत.

तुर्क लोकांनीं "कानस्तांतिनोपल" घेतलें त्यावेळेस "रोम" खेरीज करून या भूमंडळावर त्याच्यासारिखें मोठें व सुंदर असें दुसरें शहर नव्हतें. हें शहर त्या वेळेस ख्रिस्ती लोकांच्या पादशहाची राजधानी होतें. 'कान्स्टन्टाईन' नामक पादशहानें ख्रिस्ती लोकांसाठीं एक मोठें भजनालय या शहरांत बांधलें होतें, त्या भजनालयाची तुर्क लोकांनीं कानस्तान्तिनोपल घेतल्यावर मशीद केली.

तुर्क लोकांनीं पुष्कळ प्रांत आपल्या हस्तगत केले आणि पुष्कळ राष्ट्रें आपल्या सत्तेखालीं आणिलीं. अनेक लोक त्यांच्या सत्तेखालीं आले त्यांमध्यें हंगारीयन लोकांस तुर्क लोकांपासून फारच दुःख सोसावें लागलें. हंगारियन लोक चांगले शूर असल्यामुळें त्यांनीं कित्येक लढायांत तुर्क लोकांचा पाडाव केला खरा, तरी पुष्कळ प्रसंगीं तुर्क लोकांची फौज अफाट असल्यामुळें त्यांच्यापुढें हंगायिरन लोकांचें कांहीं चाललें नाहीं. या लढायांतील उभयतांच्या रक्तपाताचें वर्णन मोठें भयंकर व दुःखप्रद आहे; तरी त्यापासून संकटसमयीं देवाची शक्ति व प्रीति हीं ढळढळीत रीतीनें दिसून येतात.

हंगारी देशांत शुभवर्तमानाचा प्रसार होऊन आज बरींच वर्षें झालीं. "स्टीवन" नामक त्या देशाच्या राजानें ख्रिस्ती धर्माचा विशेष प्रसार करून व पुष्कळ देवळें बांधून त्यांत उपदेशक व शिक्षक यांची स्थापना केली होती म्हणून त्यास "पवित्र स्टीवन" व "हंगारी देशाचा प्रेषित" असेंही म्हणत असत.

याच्या मागून जे राजे झाले ते व त्यांच्या राण्या ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराविषयीं मोठ्या आस्थेनें व उत्साहानें झटत असत. हंगारी देशांतील एका राजकन्येचा विवाह जर्मन देशांतील लीडग्रेव्ह नांवाच्या मनुष्याशीं झाला

होता. तिला अद्यापि हंगारी देशाची "पवित्र अलीसाबेथ" असें म्हणत असतात.

हंगारी लोक शौर्य व सद्गुण यांविषयीं पूर्वीं हल्लींप्रमाणेंच प्रख्यात होते. त्या देशांतील लूसियस या नांवाचा एक मोठा मातबर व्यापारी होता. त्याच्या धार्मिकपणामुळें लोक त्याचा फार सन्मान राखीत असत. तो ज्या शहरांत रहात होता, त्या शहरच्या लोकांनीं त्याला "उत्तम लूसियस" असें नांव दिलें होतें. त्याची बायको हेद्वीग ही रूपानें फार सुंदर होती. ती धार्मिक व परोपकारी असे म्हणून लोक तिची फार प्रशंसा करीत.

या सुशील जोडप्यास दोन मुलगे होते. ते जुंवळाचे असून फार रूपवान होते. आईबापांचे ते दोघेही लाडके होते. त्या दोघांचे सुंदर गुलगुलीत गाल व कुरळे केस व ठळक निळे डोळे इतके सारखे दिसत कीं, त्यांस ओळखायास फार कठीण पडे. जेव्हां त्यांस एकसारखा पोषाख करीत तेव्हां त्यांच्या आईबापांस देखील वडील कोण व धाकटा कोण हें ओळखण्यास पंचाईत पडे. त्यांतील एकाचें नांव फिलेमोन व दुसऱ्याचें नांव तिमथ्यस होतें. हीं नांवें पवित्र शास्त्रांतील असून एक नांव आईनें व दुसरें बापानें दिलें होतें.

या मुलांचे आईबाप खरे ख्रिस्ती सद्भक्त होते. त्यांचें चित्त इतर वस्तूंपेक्षां ख्रिस्ताच्या प्रीतीची साक्ष लोकांसमोर पटविण्याकडे फार होतें. त्यांनीं आपल्या मुलांस लहानपणीं ख्रिस्ताचें ज्ञान प्राप्त करून देण्यासाठीं पुष्कळ मेहनत केली होती. ख्रिस्ती धर्माप्रमाणें धार्मिक व भक्तिमान होण्याजोगें शिक्षण त्यांस दिलें होतें. तीं मुलें नेहमीं आपल्या आईपाशीं असत. ती जेव्हां काम करी तेव्हां एक तिचे एका बाजूस व दुसरा दुसऱ्या बाजूस असे. ती मोठ्या प्रेमानें व ममतेनें देवानें येशूख्रीस्तास पाठवून देऊन मनुष्यमात्रावर आपली प्रीति कशी प्रकट केली तें त्यांस पवित्रशास्त्रावरून वारंवार सांगत असे.

हीं मुलें सहा वर्षांचीं झालीं तेव्हां त्यांची आई फार आजारी पडली. त्यासमयीं त्यांचा बाप नेहमीं तिच्या बिछान्याजवळ बसे, व मुलेंही नेहमी तिच्या जवळच असत. जेवणाकरितां हाक मारीत तेव्हांही त्यांस तेथून उठण्यास वाईट वाटे. एकदां तीं मुलें दुसऱ्या एका खोलींत बसलीं होतीं व चाकर लोक आपआपल्यामध्यें 'हायहाय! आतां आपल्या बाईसाहेब वांचण्याची आशा उरली नाहीं; त्या खचित आतां मरणार,' असे उद्गार काढीत होते, ते त्यांच्या कांनीं पडले. तेव्हां लागलींच तीं घाबरून एकदम आपल्या आईकडे धांवत गेलीं, आणि आपले हात उराशीं लावून तिच्या बिछान्याजवळ बसून रडूं

लागलीं व पोरबुद्धीनें म्हणालीं, 'आई तूं आतां मरणार हें खरें काय? इतक्या लौकर मरून तूं आम्हाला टाकून जाऊं नको!'

हें ऐकून आईच्याही डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या व ती म्हणाली, 'होय, माझ्या प्रिय मुलांनो, या दुखण्यांतून खचित मी पार पडत नाहीं. तुमच्यापाशीं राहण्याचें माझ्या मनांत किती जरी असलें तरी माझा उपाय नाहीं. दयाळू परमेश्वराची इच्छा अशी दिसते कीं, तुमचा माझा वियोग व्हावा. जें कांहीं तो इच्छितो तें आपल्या कल्याणासाठींच असतें. तो मला आतां आपल्याजवळ आकाशांत नेईल. तेथें ज्या वस्तु आहेत त्या येथल्याहून फार सुंदर व उत्तम आहेत. तेथें रोग, मृत्यु, दुःख, शोक, हीं मुळींच नाहींत. तेथें शांति, आनंद, व सुख हीं आहेत. जर तुह्मी विश्वास ठेवून प्रार्थना कराल व पवित्रपणें वागाल तर तुम्हीही तेथें याल.'

याप्रमाणें तिच्या दुखण्यांत तिनें त्यांस फार चांगला उपदेश केला. एके-दिवशीं संध्याकाळीं तीं मुलें व त्यांचा बाप तिच्या बिछान्याजवळ उभीं असतां ती एकदम मरणोन्मुख झाली व आपले डोळे वर आकाशाकडे करून सद्गदित होऊन म्हणाली, 'प्रभु, तूं मला आपलेकडे बोलावतोस.' असें बोलून तिनें आपल्या दुःखित नवऱ्याला शेवटचा सलाम करण्यासाठीं आपला हात पुढें केला. नंतर आपले दोन्ही हात लांब करून मुलें रडत उभीं होतीं त्यांच्या डोक्यांवर हात ठेवून त्यांस आशीर्वाद देऊन ह्मणाली, 'माझ्या प्रिय बाळांनो, जें कांहीं चांगलें शिक्षण माझ्यानें देववलें तें मी तुम्हांस दिलें. आतां त्याप्रमाणें वर्तण्याची वेळ आली आहे. परम दयाळु व प्रभु येशूख्रीस्त तुमच्या अंतःकरणांत वस्ती करो! हे माझ्या प्रिय मुलांनो, तुमच्या हातून अगदीं लहान सुद्धां पाप घडूं देऊं नका. आकाशांत पुन्हा आपली भेट होईल.'' नंतर मुलांनीं तिच्यापुढें गुडघे टेंकले व तिनें पुनः त्यांस आशीर्वाद दिला. मग तिचा आत्मा शांतपणें वर गेला.

बापानें आणखी एकवेळ त्या मुलांस प्रेत पेटींत घालण्याच्या पूर्वीं त्याजवळ नेऊन त्यांजपासून आईनें आम्हांस सांगितलें त्याप्रमाणें आम्ही मरेपर्यंत चालूं व तिच्याप्रमाणेंच येशूवर विश्वास ठेवूं असें कबूल करून घेतलें. वचन देतांना मुलांचे डोळ्यांतून अश्रुधारा खळखळा चालल्या हें पाहून त्यांच्या बापाच्यानेंही गहिंवर आवरून धरवेना म्हणून तोही रडूं लागला.

जेव्हां बाप प्रेताबरोबर जावयास निघाला तेव्हां तीं दोन्ही मुलें स्फुंदत

रडून त्याबरोबर कबरस्थानांत गेलीं. इतर लोकांचाही मोठा जमाव तेथें जमला होता. आलेले लोक त्या मुलांकडे पाहून रडूं लागले गोरगरीबांस व लहानमोठ्यांस त्या बालकांची खिन्न चर्या व रडरडून त्यांचे सुजलेले डोळे पाहून फार कळवळा आला. पेटी कबरेंत ठेवण्यापूर्वी मुलांनीं कांपत कांपत व भीत भीत जाऊन आपल्या आईच्या तोंडाचें अखेरचें दर्शन घेतलें.

जे लोक तेथें मिळाले होते ते म्हणूं लागले कीं, 'कायहो ही अघटित करणी! या मुलांची आई किती चांगली होती. तिचा व तिच्या पोरांचा वियोग देवानें कसा केला हो!' या उत्तरक्रियेकरितां जो पाद्री आला होता, त्यानें हें बोलणें ऐकलें व तो त्या समुदायास म्हणाला, 'जे शब्द म्यां आतां तुमच्या मुखांतून ऐकले त्यांवरून मला पवित्र शास्त्रांतील एक ओवी आठवते ती हीं—"माझा बाप व माझी आई यांनीं मला टाकिलें, तरी परमेश्वर मला घेईल." [गीत २७. १०] हें शास्त्रांतील वाक्य सर्व अनाथ मुलांस किती समाधानकारक आहे. तर जशीं हीं दोन मुलें आज त्या वाक्याची आठवण करितात तशीच सर्व अनाथ मुलांनीं याची सदोदीत आठवण करावी व कधींही हें विसरूं नये."

आणखी त्या उपदेशकानें त्यांस योसेफाची गोष्ट सांगितली. योसेफ लहान होता तेव्हां त्याची आई मेली व त्याला त्याच्या बापापासून चोरून नेलें. तरी ईश्वरानें त्याचा कसा सांभाळ केला आणि त्याचें व त्याच्या बापाचें कल्याण कसें केलें, हें सर्व सविस्तर सांगितलें. सरतेशेवटीं त्या भल्या उपदेशकानें 'मी तरुण होतों आतां वृद्ध झालों, तरी नीतिमान टाकलेला अथवा त्याचें संतान भीक मागतां म्यां पाहिलें नाहीं,' [गीत ३७.२५] हें दाविदाचें वाक्य सांगून आपला उपदेश संपविला.

---

## प्रकरण २.

### चोरून नेलेलीं मुलें.

मुलांच्या आईचे मरणानंतर लूसियस ज्या नगरांत राहात असे तें त्यास उदास वाटूं लागल्यामुळें तो दोन कोसांवर एका गांवांत आपलें स्वतःचें फार सुंदर घर होतें तेथें आपल्या मुलांसहवर्तमान जाऊन राहिला. तेथें राहिल्यानें मुलांच्या विद्याभ्यासाकडेस त्यास विशेष लक्ष देतां येऊं लागलें. जेवणाच्या-

वेळीं व बाहेर फिरावयास जाई त्यावेळेस तो त्यांस आपल्याबरोबर घेई, एव-ढेंच नव्हे तर आपल्या लिहिण्याच्या खोलींत देखील स्वतःच्या नजरेखालीं त्यांस धडे शिकण्यास व खेळण्यास सांगत असे. स्वतः त्याला जरी फार काम पडत असे तरी दर दिवशीं दोन तास तो आपल्या मुलांस लक्ष लावून शिकवी. त्या खेडे गांवांत तोच काय तो त्यांचा शिक्षक. तो नित्य उठून त्यांच्या बरोबर प्रार्थना करी, व प्रति रविवारीं आणि सणाचे दिवशीं घरीं नेमलेले शुभवर्तमानाचे भाग वाचून दाखवून त्यांवरून त्यांस बोध करी. जेव्हां जेव्हां तो आपल्याबरोबर त्यांस घेऊन बागांत किंवा मळ्यांत फिरावयास जाई तेव्हां तेव्हां ईश्वराची करणी किती अद्भुत आहे हें त्यांच्या मनांत ठसवी.

कुटुंब निवर्तल्यापासून या धार्मिक गृहस्थाला सुख म्हटलें म्हणजे काय तीं हीं दोन मुलें. मुलेंही मनापासून त्यावर प्रीति करीत, व काडीमात्र त्याच्या आज्ञेबाहेर जात नसत. मुलांच्या आईच्या मरणानें जें नुकसान आपणास सोसावें लागलें तें सर्व हीं गुणी मुलें मोठीं झालीं म्हणजे भरून येईल अशी त्यानें उमेद बाळगली होती.

पण लौकरच आगींतून निघून फुपाट्यांत पडावें त्याप्रमाणें त्याची अवस्था झाली. त्याला पहिल्यापेक्षां मोठें संकट प्राप्त झालें. प्रत्येक आठवड्यांत त्याला कामामुळें दोनवेळ शहरांत जावें लागत असे. एका दिवशीं असा कांहीं योग घडून आला कीं, त्याला कांहीं अगत्याच्या कामांसाठीं तिसऱ्यानें जाणें भाग पडलें. त्या दोन्हीं मुलांचे मुके घेऊन त्यानें त्यांच्या पोक्त व धार्मिक दाईच्या स्वाधीन त्यांस केलें. नंतर त्यांचा निरोप घेऊन, व संध्या-काळीं मी लौकरच परत येईन, अशी त्यांची समजूत करून तो बाहेर पडला. मुलें बाहेर ज्या ठिकाणीं घोडा उभा होता तेथवर त्याचे बरोबर गेलीं. बापानें पुन्हा त्यांचा मुका घेतला व घोड्यावर बसून घोडा भरधांव फेंकला.

त्याच्या घरासमोर एक मोठा बाग होता त्यांत हिरवें चार गवत उगवलेलें मैदान होतें. कांहीं मोठाली झाडें होतीं त्यांची त्या मैदानांत दाट सावली पडत असे. त्या झाडांच्या आसपास निरनिराळ्या फुलझाडांच्या रांगा लागलेल्या होत्या व त्यांचे भोंवताली करवंदी वगैरेचीं झुडपें होतीं. ह्या बदामी आका-राच्या बागाचे चौफेर फार रुंद वाळू घातलेला रस्ता होता. ही बाग त्या दोघां मुलांची खेळण्याची जागा होती. तीं मुलें त्या सुंदर हिरव्या गवता-वर उड्या मारीत, अथवा चेंडू खेळत अगर एकमेकांचा घोडा करून त्या

मोठया रस्त्यावर फिरत व त्या झाडांवर घरटीं बांधून त्यांच्या आसपास हवा खाणारे पक्षी जीं सुंदर गाणीं गात तीं ऐकत.

त्या दिवशीं मुलांनीं फुलझाडांच्या रागांच्या आसपास फिरतां फिरतां गुलाबाचें झाड पाहिलें. तें एका मोठया अंजिराच्या झाडाखालीं होतें. त्याचे जवळ पालथी पडलेली एक फुलझाडाची कुंडी त्यांनीं पाहिली. त्या कुंडीचे तुकडे झाले होते ते पाहून तिमथ्यस म्हणाला, 'ही कुंडी येथली नाहीं. माळ्यानें हे फुटलेले तुकडे येथें ठेवावयाचे नव्हते.' नंतर फिलेमोनानें त्या कुंडीचे तुकडे फेंकून द्यावयाचे हेतूनें उचलून घेतले पण त्या फुटलेल्या कुंडीच्या आंत एका लहान पक्ष्याचा घरोटा पाहून त्यांस मोठें नवल वाटलें. त्या घरोटयांत पांच लहान पक्षी चूं चूं करून आपल्या पिंवळ्या लांब चोंची उघडतांना त्यांनीं पाहिलें. हें पाहून तिमथ्यस म्हणाला, 'हा खोपा एका सुंदर बुलबुलाचा आहे. पहा तो बुलबुल झाडावर इकडे तिकडे उडून आपल्याकडेस टवकारून पाहात आहे. त्याला असें वाटतें कीं आपण हीं त्याचीं पिलें घेऊन जाऊं.'

फिलेमोन त्यापक्षाकडे पाहून म्हणाला, 'आम्ही तुझ्या पिलांस कांहीं इजा करणार नाहीं'. अखेरीस त्या मुलांनीं ती कुंडी त्या खोप्यावर पुन्हा पालथी घातली व तेथून जरा दूर जाऊन तीं मुलें तो बुलबुल आपल्या पिल्यांजवळ येतो कीं नाहीं हें पाहण्यासाठीं पाठीमागें पाहूं लागलीं. तो पक्षी लौकरच चोचींत एक माशी धरून आपल्या पिलांसाठीं आणून एका बाजूस जी फट होती तींतून आंत शिरला. हें पाहून मुलांस फार आनंद झाला. तिमथ्यस म्हणाला, 'बाबानेंही असेंच आपल्यास सांगितलें होतें कीं, हे पक्षी आपले घरोटे लहान झुडपांत किंवा पोखार जमिनींत बांधतात. फुटलेल्या कुंडींत ह्या पक्ष्यांस फार चांगली जागा सांपडली आहे. जेव्हां आपण बाबास हा पिंवळ्या पांच पक्ष्यांचा खोपा आणून दाखवूं तेव्हां त्याला केवढा आनंद होईल बरें!'

याप्रमाणें त्यांचें बोलणें चाललें आहे इतक्यांत उत्तम पोषाख केलेला एक मनुष्य नजरेस पडला. मुलांनीं त्या मनुष्यास पूर्वीं वारंवार आपल्या बापाशीं देवघेव करतांना पाहिलें होतें व त्यानेंही मुलांस कधीं कधीं कांहीं खेळणीं आणून बक्षीस दिलीं होतीं. तो मनुष्य त्यांच्या जवळ आला. मुलांनीं त्याला मोठया प्रीतीनें सलाम करून पक्ष्याचा कोठा नुक्ताच त्यां सांपडला होता

तो त्यांनीं त्याला दाखविला. तो गृहस्थ त्यांस म्हणाला, 'छि:! यांत काय अर्थ आहे!! मी तुम्हास एक दुसरा कोठा दाखवितों. तो पाहिल्यावर तुम्हास मोठें नवल वाटेल. त्यांत लहान लहान दहा पिलें आहेत, व त्यांची आईबापें नेहमीं त्यांतच रहातात. तुम्ही जे पक्षी पाहिलेत त्यांपेक्षां हे पक्षी फार सुंदर आहेत. काय त्यांची शोभा मी तुम्हांस सांगूं! ते तर हिऱ्यासारखे चमकतात व असें सुंदर गातात कीं, बुलबुलाचें गाणें त्यांच्या पुढें कांहींच नाहीं. तुम्ही असले पक्षी कधींच पाहिले नसतील. कधीं असे पक्षी आहेत म्हणून ऐकलें सुद्धां नसेल. ह्या पक्ष्यांचा कोठा तुमच्या घरामागें आहे. चला माझ्याबरोबर मी तो तुम्हांस दाखवितों.'

मुलें मोठ्या आनंदानें त्याच्या बरोबर गेलीं. त्यांच्या घरापासून सुमारें एक गोळीच्या टप्प्यावर तीं झुडपें होतीं. त्या ठिकाणीं आल्यावर त्या मुलांनीं दुसरा एक माणूस दोन घोडे हातांत धरून उभा राहिलेला पाहिला. त्या घोडेवाल्यानें व या पिलें दाखविणारानें जलदी करून एकेका मुलाला आपल्या पुढें घोड्यावर घेतलें. तेव्हां त्या मुलांच्या मनांत रडावयाचें होतें; व जर तीं रडलीं असतीं तर त्यांचें रडणें ऐकून कोणी तरी त्यांच्या मदतीस आलें असतें. पण, झटदिशीं त्या माणसांनीं रुमालाचे बोळे त्यांच्या तोंडांत घालून त्यांस आपल्या झग्यांत लपवून घोडे भरधांव फेंकले.

इकडे सायंकाळीं मुलांचा बाप घराजवळ येऊन पोंहचला. इकडे तिकडे पाहातो तों नेहमीप्रमाणें मुलें आनंदानें ओरडत आपल्याला सामोरीं येतांना दिसत नाहींत. तेव्हां त्याला आश्चर्य वाटलें. तेथें त्याचा घोडा धरण्यासही कोणी आलें नाहीं, म्हणून तो घोड्यावरून उतरून घरांत आला. ओसरी-वर घरांतलीं माणसें जमा झालीं होतीं. त्याला पाहिल्याबरोबर त्यांचा थर-कांप झाला. दुःखामुळें त्यांचीं तोंडें उतरून गेलेलीं पाहून मोठ्या कळवळ्यानें त्यानें त्या चाकरांस विचारलें, 'असें कां? झालें काय?'

तेव्हां दाई रडत म्हणाली. 'अगाई!! आतां कसें करूं! मुलें तर येथें नाहींत, हाय हाय! त्यांचें काय झालें कोण जाणे! गांवांत घरोघरीं जाऊन आम्ही त्यांचा शोध केला; पण त्यांचा कोठेंही मागमूस लागत नाहीं. आतां करूं तरी काय! झालें तरी काय! माणसांमागून माणसें रानांत व सरोवराच्या काठीं त्यांच्या शोधाकरितां पाठविलीं. पण कांहीं पत्ता लागत नाहीं!' दिवा-णजी म्हणाले कीं, 'मुलें कांहीं पाण्यांत बुडालीं नाहींत इतकें माझ्याच्यानें

सांगवतें. तीं तळ्याकडे कांहीं गेलीं नाहींत, कारण त्यांच्या पायांतला एक जोडा व टोपी रानांत वनकऱ्याला सांपडली. ती टोपी व तो जोडा मेजावर आहे, पहा.' त्यानें अणखी सांगितलें कीं, मोठया सडकेच्या टोंकापर्यंत दोन घोडयांच्या सुंबांचा माग लागतो. पुढें इतर घोडे त्या वाटेनें गेले यामुळें त्यांच्या सुंबांच्या खुणा उमगत नाहींत.'

हें ऐकून बापाची चर्या फिक्कट मेतवत होऊन तो त्या आपल्या दुःखित चाकरांमध्यें उभा राहिला व आपले डोळे वर आकाशाकडे करून मोठया दीनवाणीनें ह्मणाला, 'हे दयाळू देवा! माझीं मुलें पाण्यांत बुडून मेलीं असतीं तरी बरें झालें असतें, कारण तीं दिव्य दूतांप्रमाणें तुजजवळ आकाशांत गेलीं असतीं. पण तीं कोणीं चोरून नेलीं हें मात्र फार वाईट झालें. आतां त्यांची फार बिघडणूक होण्याचें भय आहे. तरी हे परमेश्वरा! कोठें जरी तीं असलीं तरी तीं तुझ्या हातांत आहेत.' अशी प्रार्थना करून आपलें डोकें पुन्हा गुडघ्यांत घालून हात जोडून ह्मणाला. हे जगदीश! त्यांचा सांभाळ कर, त्यांस पापापासून दूर ठेव! अशाप्रकारें फार वेळ प्रार्थना केल्यावर, आपल्या चाकर माणसांस कांहीं ठपका न देतां व त्यांच्यावर रागेंही न भरतां तो खोलींत जाऊन बसला.

---

## प्रकरण ३.

## गुलामांचा व्यापार.

फिलेमोनास व त्याच्या भावास एका मोठया कावेबाज ठकानें चोरून नेलें. याच चोरानें पूर्वी त्यांचे बापाशीं देवघेव करण्याचा यत्न करून पाहिला होता. पण लवकरच लूसियसाला दिसून आलें कीं, हा चोर आपल्याला ठकवूं पाहातो. ह्मणून एका दिवशीं त्याला झिटकारून सांगितलें कीं तुजशीं व्यवहार करण्याची माझी इच्छा नाहीं.

त्यावेळेपासून या लुच्चानें गांवांत दुसऱ्या एका धनवान व्यापाऱ्याचा आश्रय केला व आपल्या आश्रयदात्यास ठकवून त्यापासून त्यानें बरीच मोठी रक्कम उपटली. त्या व्यापाऱ्यानें आपलें नुकसान या लुच्चानें कसें केलें तें लूसियसाला सांगितलें; कारण जे कोणी दुःखांत किंवा संकटांत पडत व ज्या कोणावर जुलूम होई ते सर्व येऊन आपलें गाऱ्हाणें लूसियसाजवळ करीत व लूसियस तें सर्व ऐकून घेऊन त्यांचें समाधान करून त्यांस शक्त्यनुसार मदतही

करीत असे यास्तव, लूसियसानें त्या व्यापाऱ्याचें खटलें हातांत घेऊन व त्या ठकास पकडवून त्याच्या खटल्याची चौकशी होईपर्यंत त्याला कांहीं महिने तुरुंगांत टाकविलें. शेवटीं त्या खटल्याचा निकाल होऊन त्याला मोठी शिक्षा मिळाली व दंडही होऊन त्या व्यापाऱ्याची रक्कम उपटली होती तेवढी परत देणें पडली. याच माणसानें लूसियसाचीं मुलें चोरून नेलीं. याची ठकबाजी लूसियसास माहीत नव्हती. लूसियसाच्या शेजाऱ्यांपैकीं एकानें सांगितलें कीं, हा लुच्चा एकदां तुझ्या घराच्या आसपास दडून बसला होता. पण तो असलें दुष्ट कर्म करील असें त्यास कधीं वाटलें नाहीं.

मुलें कोणीतरी चोरून नेलीं असावीं याविषयीं लूसियसास संशय अगदीं राहिला नाहीं. मुलांचा पत्ता लागावा म्हणून त्या लुच्चाचा शोध चालविला. जो कोणी त्या लुच्चाचा पत्ता लावून देईल त्याला हजार रुपये बक्षीस मिळतील अशी दंवडी चोहोंकडे पिटविली. सर्व प्रकारचे यत्न करून शोध चालविला पण कांहीं निष्पन्न झालें नाहीं; कारण तो दुष्ट त्या प्रांतांत कोणाचेच दृष्टीस पडला नाहीं.

तो लुच्चा तुरुंगांतून सुटल्यादिवसापासून लूसियसावर चडफडून त्याचा सूड उगविण्यास पहात होता. सूड कोणत्या रीतीनें घ्यावा याचा त्यानें पुष्कळ विचार केला. शेवटीं त्यानें असें ठरविलें कीं लूसियसाचीं दोन्हीं मुलें चोरून न्यावीं म्हणजे झालें. यापेक्षां त्याचें दुसरें अधिक नुकसान तें आपल्या हातून काय होणार? असा विचार करून संधि पाहून त्याच्या मुलांवर त्यानें अवचित झांप घातली व त्यांस घेऊन लागलाच घोडा भरधांव पिटाळला. जर त्याच्या मनांत त्या मुलांस विकण्याचें आलें नसतें तर त्या चांडाळानें त्यांस ठार सुद्धां मारून टाकलें असतें. तो आपल्या सोबत्यांस म्हणाला, मी या लेंकरांस ठार मारणार नाहीं; कारण तीं फार सुंदर असून इतकीं सारखीं आहेत कीं एकास लपवून दुसऱ्यास पुढें करण्यास हरकत नाहीं. अशी जोडी बहुतकरून मिळणें दुर्लभ; याकरितां मी त्यांस विकीन. मला ठाऊक आहे कीं एकदम मोठी रक्कम मला प्राप्त होईल.

तो लुच्चा त्या मुलांस घेऊन तुर्कस्थानाच्या सरहद्दीपार पळून गेला. ती सरहद्द हंगारी देशांतल्या एका शहराच्या लगतच होती. त्याकाळीं तुर्कस्थानाच्या सर्व प्रांतांत जीं मोठमोठीं नगरें होतीं त्यांत प्रवाश्यांस उतरण्याकरितां धर्मशाळा बांधलेल्या होत्या. त्या धर्मशाळांत वाटसरास तीन दिवसपर्यंत खाण्यास व राह-

ण्यास फुकट मिळत असे. एक धर्मशाळा एका गृहस्थानें तुर्की व्यापाऱ्यांसाठींच बांधली होती. त्यांतील खोल्या मोठ्या व प्रशस्त होत्या. बाकींच्या धर्मशाळांत व हींत इतकाच भेद होता कीं येथें त्या तुर्की व्यापाऱ्यांस खाण्यापिण्याबद्दल व आपली तरतूद राखण्याबद्दल पैसे द्यावे लागत असत. तुर्की व्यापारी प्रायः येथें येऊन उतरत असत. या धर्मशाळेंत हा ठक या मुलांस घेऊन आला व जेथें फुकट खाण्यास व राहण्यास मिळत असे त्या खोलींत येऊन राहिला. पण ज्या खोल्यांत मोठाले व्यापारी उतरत असत त्यांत जाऊन नित्य कोण कोण उतरले त्याचा शोध ठेवी.

एका दिवशीं सेलीम या नांवाच्या व्यापाऱ्यास या लुच्चानें पाहिलें. सेलीम हा सर्व प्रकारचीं उंची वस्त्रें, गालिचे व सतरंज्या यांचा व गुलामांचाही व्यापार करीत असे. त्यावेळीं गुलामांचा व्यापार तुर्कस्थानांत चालत असे. त्या चोरानें हीं मुलें त्या तुर्की व्यापाऱ्यापुढें आणून उभीं केलीं. तो व्यापारी या मुलांस पाहून म्हणाला 'हीं दोन मुलें फार सुंदर आहेत हीं मला फार आवडतात; पण यांस घेऊन मी काय करूं? यांच्याकडून कांहीं काम होणार नाहीं. गुलामगिरी करण्यासारिखे होतपर्यंत निरर्थक यांस पोसावें लागेल.'

जेव्हां या मुलांस समजलें कीं, आपल्याला गुलामाच्या नात्यानें विकणार तेव्हां त्यांचा थरकांप होऊन त्यांनीं रडून आकांत मांडला. हें पाहून त्या तुर्की व्यापाऱ्याच्या पोटांत दया उत्पन्न होऊन त्यानें नफ्यातोट्याकडे न पहातां त्यांस खरेदी केलें, व मनांत म्हटलें कीं, 'दुसरा कोणी यांस विकत घेईल त्याच्यापेक्षां मी यांचा सांभाळ चांगला करीन.' नंतर त्यांचे किंमतीची जी रक्कम ठरली ती त्या ठकास दिली. ती रक्कम पाहून तो ठक फार खुष झाला. व्यापारी तर तीं मुलें आपल्याबरोबर घेऊन ज्या गांवांत तो राहत होता तेथें गेला. परंतु त्याची बायको जराशी तुसडी होती तिला हीं मुलें त्यानें विकत घेतलीं हें बरें वाटलें नाहीं. तरी त्या दोन परक्या पोरांस पाहून घरांतलीं लेंकरें फार आनंदित झालीं. सेलीमानें त्यांस आपल्या मुलांबरोबर राहण्याची परवानगी दिली. तो त्यांस आपल्या मुलांसंगतीं जेवूं व खेळूं देऊं लागला. जीं लहान सहान घरांतलीं कामें आपलीं मुलें करीत तीं त्यांनीं व या दोघांनीं मिळून करावीं असा हुकूम केला. हीं विकत घेतलेलीं दोन मुलें जराशीं जाणतीं व सशक्त होतील तोंपर्यंत त्यांस आपल्या मुलांबरोबर ठेवावयाचें त्याच्या मनांत होतें. त्या तर्की मनुष्याच्या मुलांच्या सहवासानें या मुलांस साधारण बोल-

त्यापुरती तुर्की भाषा येऊं लागली. या ठिकाणीं जर घरची आठवण होऊन बापाची खंत त्या मुलांस वाटली नसती तर तीं येथें फार सुखी झालीं असतीं. पण विशेष दुःख त्यांस हें होई कीं, त्यांना येशू ख्रिस्ताविषयीं त्या तुर्की मुलांशीं बोलण्यास धीर होत नसे. कारण तें पवित्र नाम कोणी तोंडांतून काढूं नये, व जर काढलें तर मोठी शिक्षा होईल अशी दंवडी त्या देशांत पिटली होती.

---

## प्रकरण ४.

### धार्मिक माळी.

सेलीम ज्या गांवांत राहत असे त्या गांवांत इब्राहीम नांवाचा एक धनवान व्यापारी राहात होता. त्याची एक फार सुंदर बाग होती. त्या बागेकरितां त्यानें एक माळी ठेविला होता. तो माळी त्या बागेची व्यवस्था ठेवीत असे. त्याच्या बागेंत शाकभाजी व फळें इतकीं उत्पन्न होत कीं, तीं घरांत पुरून बाजारांत विकण्यास पाठवायासही सांपडत. एके दिवशीं या दोन मुलांच्या धन्यानें ह्या मातबर तुर्काचे बागेंतून शाकभाजीची पांटी आणण्याकरितां या मुलांस पाठिवलें. हा माळी पोक्त ख्रिस्ती मनुष्य असून गुलाम होता. तो बागेंत एक वाफा खणीत होता व खणून खणून थकला ह्मणून नुक्ताच झाडाच्या सावलींत गवतावर जरासा विसावा घेत पुस्तक वाचीत होता. त्याच्याजवळ एक पावडें व जवाच्या भाकरीचा तुकडा, थोडेंसें दहीं, व पाण्याचें गाडगें पडलें होतें. हीं दोन्हीं मुलें हातांत पांट्या घेऊन त्याच्यापुढें येऊन उभीं राहिलीं. त्यांस पाहून त्या माळ्यास फार दया आली. त्यांचे सुंदर व अगदीं एकसारिखे चेहरे व त्यांचा बापाच्या घरून आणिलेला छान हंगारी पोषाख पाहून माळी अगदीं चकित होऊन गेला. माळ्यानें हंगारी भाषेंत फार ममतेनें त्यांस सलाम करून सांगितलें कीं, ज्या देशांतून तुम्ही आलां तेथलाच मी आहें. त्या मुलांस आपली भाषा ऐकून मोठा आनंद झाला. माळ्यानें त्यांस पुसलें, "तुह्मीरे कसे गुलामगिरींत सांपडलांत?" त्यावरून त्यांनीं आपली सर्व कथा त्याला सांगितली व जेव्हां बापाचें नांव तोंडांतून निघालें तेव्हां त्या मुलांस गहिंवर येऊन तीं रडूं लागलीं. माळ्यानें त्यांची समजूत करून त्यांस विचारलें कीं, तुम्हांस कोणी ख्रिस्ती धर्माचा बोध केला आहे कीं काय? मलगे बोलले, होय, आह्मांस मभची मार्थना व मेषितांचा

मतांगीकार चांगला ठाऊक आहे, व आम्हीं दोघे मिळून एका ठिकाणीं प्रार्थनाही करीत असतों. माळी म्हणाला, "बरें तर. 'हे आमच्या आकाशांतील बापा' ही प्रार्थना तुम्हाला येत असली तर मला म्हणून दाखवा. दोघांनींही आपले हात वर करून प्रार्थना करण्यास आरंभ केला; व वर आकाशाकडे पाहून, 'हे आकाशांतील बापा' हे शब्द त्यांनीं मोठ्या भाविकपणानें म्हटले. तेव्हां या सज्जन माळ्यास मोठा आनंद झाला. त्यानें त्यांस शाबासकी देऊन माझें नांव अन्तोनियो आहे आणि मीही खिस्ती आहें असें सांगितलें. तेव्हां मोठ्या सन्मानानें त्याच्या हाताचें चुंबन घ्यावयास मुलें पुढें सरसावलीं, पण तो चुंबन घेऊं देईना. त्यानें बापाप्रमाणें त्यांस बोध करून सांगितलें कीं, तुह्मी खिस्तावरचा विश्वास न सोडतां देवावर भाव ठेवीत जा. असें बोलून वर आकाशाकडे पाहून मोठ्या प्रेमानें त्यांस ह्मटलें कीं "दयाळू परमेश्वर तुह्मां-वर दया करील व तुम्ही आपल्या सज्जन बापाच्या मांडीवर पुन्हा जाऊन ब-साल." नंतर त्यानें त्यांस आशीर्वाद देऊन त्यांच्या पांट्या भाजीपाल्यानें भरून दिल्या व त्यांस उत्तम प्रकारचीं फुलेंही दिलीं. तीं मुलें घाइघाईनें व आनंदानें घरीं आलीं व त्यांनीं तीं फुलें आपल्या धन्याच्या लेंकरांस दिलीं.

अशा प्रकारें तीं मुलें वरचेवर त्या बागेंत भाजी आणण्यास जाऊं लागलीं. त्यांच्या धन्याचीं मुलें पांट्या घेऊन जाण्यास लाजत असत. तेव्हां अर्थात् हीं मुलें खुषीनें जातात हें पाहून त्यांस फार आनंद झाला. तो माळी या मुलांस जीं फुलें व फळें बक्षीस देई त्यांतला वांटा हीं मुलें आपल्या धन्याच्या मुलांस देत. सबब धन्यांचीं मुलें ह्या मुलांस असें म्हणूं लागलीं कीं, "तुह्मींच पांट्या घेऊन बागांत भाजी आणावयास जावें हें आह्मास फार आवडतें, कारण जेव्हां आह्मी स्वतां भाजी आणण्यास जात होतों तेव्हां त्या माळ्यानें आह्मांस अशीं सुंदर फळें व फुलें कधीं दिलीं नाहींत."

यामुळें तीं मुलें बहुतकरून नित्य त्या बागांत जात व तो धार्मिक माळी त्यांस कोणती तरी बोधपर व मनोरंजक गोष्ट सांगे. अशा प्रकारें ही सुखानें जाणारी घटका अर्धघटका केव्हां येईल असें त्यांस रोज होई. मुलांच्या विनंतीवरून सेलीमानें त्या माळ्याचा कामधंदा आटपल्यावर रोज एक तास त्याजवळ बसण्यास त्यांस परवानगी दिली होती. हा त्यांचा परक्या देशांत मिळालेला एक तास मोठ्या आनंदानें जाई, व असा चांगला खिस्ती उपदे-शक आपणास सदुपदेश करण्यास मिळाला म्हणून ते देवाचे उपकार मानीत.

# प्रकरण ५.

## गुलामांचा बाजार.

अशा स्थितींत सुमारें दोन वर्षें निघून गेलीं. मध्यंतरीं सेलीमाची व त्या मुलांची एकमेकांवर इतकी प्रीति बसली कीं, त्यांस विकावें असें त्याला कधीं वाटलें नाहीं. पण सेलीमाप्रमाणें त्याची बायको या मुलांवर प्रीति करीत नव्हती. एका दिवशीं ती नवऱ्याला म्हणाली; ‘ अहो, आपण हीं मुलें विकत घेऊन आजपर्यंत त्यांस बाळगलें खरें. पण आतां विकावें हें बरें आहे, कारण त्यांच्या खाण्यापिण्याचा व वस्त्राचा खर्च फारच होतो. तीं आतां बरींच मोठीं झालीं आहेत. कोणतेंही काम करून त्यांस आपलें पोट भरतां येईल म्हणून त्यांनीं आपलें घर सोडावें हें उत्तम.’

त्या बाईनें पैशाकडे नजर देऊन त्यांस विकण्याची इच्छा दर्शविली असें नाहीं; तर जीं कोणी माणसें तिला भेटायाला येत तीं त्या मुलांचे सौंदर्याचें व त्यांच्या प्रेमळ स्वभावाचें वर्णन करीत व तिचे पोटच्या मुलांचें नांव देखील काढीत नसत. यामुळें तिचे मनांत ईर्षा उत्पन्न होऊन ती आपल्या मुलांस उत्तम उत्तम पोषाख करी व ह्या दोन मुलांस मिळतील तितकीं वाईट जाडीं भरडीं वस्त्रें देई. पण हें तिचें सर्व करणें वायां जाई. कारण, त्या मुलांच्या अंगावर वाईट वस्त्रें असत तरीसुद्धां लोक त्यांस चहात. एकदा कोणीएक बाई तिच्या घरीं कांहीं कापडें खरेदी करण्यास आली त्या वेळेस फिलेमोन व तिमथ्यस ज्या खोलींत सेलीमाची बायको होती त्या खोलीच्या एका कोंपऱ्यांत दाणे चाळीत बसले होते. त्यांच्याकडे पाहून ही परकी बाई थक्क झाली, व मोठ्यानें म्हणाली ‘ अहाहा ! किती सुंदर हीं मुलें आहेत. ’ असें बोलून ती घरधनिणीस म्हणाली. ‘ काय हो बाई हें तुमचें भाग्य ! अशीं सुंदर मुलें कोणाच्या नशिबीं आहेत !’ असें ती बोलत आहे इतक्यांत, तिचीं मुलें आंत आलीं. त्यांस पाहून ती परकी बाई बोलली, ‘ कोणाचीं हीं शेंबडीं पोरें ! मला वाटतें तीं तुमच्या शेजाऱ्याचीं असतील. त्याचीं वस्त्रें जशीं चांगलीं आहेत तशी त्यांची चालचलणूक दिसत नाहीं. त्या दोन मुलांत व या मुलांत जमीनअस्मानाचें अंतर दिसतें.

असें पुष्कळ वेळ झाल्यामुळें त्या घरधनिणीनें त्यांस पाहिलें म्हणजे तिच्या

ळपायांची आग मस्तकांत जाई. ह्मणून एके दिवशीं आपल्या नवऱ्याला म्हणाली कीं; 'हीं मुलें माझ्या दृष्टीसमोर देखील नकोत. त्यांनीं माझ्या घरांतून गेलेंच पाहिजे. तीं जितके लवकर जातील तितकें उत्तम.'

या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर त्या गांवापासून बऱ्याच अंतरावर पाच्छा राहात असे, त्या नगरांत एक मोठी जत्रा भरणार होती हें पाहून ती बाई आपल्या नवऱ्यास म्हणाली, 'तुम्हीं ह्या दोन्ही कारट्यांस घेऊन जा, व तेथें यांस विकून टाका. मला कांहीं त्यांना घरांत ठेववत नाहीं. आतां मी इतकें मात्र करीन कीं चांगली किंमत उभी राहावी ह्मणून यांस चांगला पोषाख करीन. कशा तरी रीतीनें ही एकदांची येथून जावोत आणि आपल्या कपाळची खटखट निघो.'

सेलीमाला हें अगदीं आवडलें नाहीं. तो चांगल्या स्वभावाचा माणूस खरा पण बाईलबुद्ध्या होता. नेहमीं तो त्या भांडखोर बायकोच्या हुकमांत राही; म्हणून तिच्या सांगण्याप्रमाणें त्यानें गाडी मागविली व आपण त्या मुलांसुद्धां तींत बसून चालता झाला. पाच्छाच्या नगरास पोहोंचल्यावर मुलांस हातांत हात घालून पुढें चालविलें व आपण त्यांच्या मागून चालत चालत त्या बाजारांत गेला. तो बाजार पाच्छाचे हवेलीजवळ होता. त्या सुंदर मुलांस पाहातांच लोकांची मोठी गर्दी त्यांच्या भोंवतीं झाली. हीं मुलें सुंदर व अगदीं एकमेकांसारखीं अशीं पाहून सर्व लोक फार खुष झाले. पुष्कळ गिऱ्हाइकें त्यांस विकत घेण्यासाठीं तयार झालीं; पण 'हीं मुलें इतकीं लहान नसतीं तर त्यांची किंमत बरीच आली असती; गुलामाच्या कामास हीं फार नाजुक आहेत,' असें बोलून तीं चालतीं झालीं. त्यानंतर दोन गिऱ्हाइकें आलीं. त्यांत एक मूर व दुसरा तुर्क होता. त्यांच्या मनांत त्या मुलांचा सौदा करण्याचें होतें. पण कांहीं वेळानें तेही म्हणूं लागले कीं, 'या मुलांचा कांहीं उपयोग होणार नाहीं.' सेलीम म्हणाला; 'तें तर खरें पण जो कोणी त्यांचा धनी होईल त्याचा हीं मुलें हुक्का भरून देतील, त्याला काफी करून देतील, निदान बागेंतलीं खालीं गळलेलीं लिंबें गोळा करून तरी आणतील.' यूरोपांतील लोकांस कोणी काळा चाकर मिळाला म्हणजे मोठें भूषण वाटे. तसेंच आफ्रिकेंतील लोकांसही कोणी गोरा चाकर मिळाला ह्मणजे भूषण वाटे. तो चाकर कोणच्याही कामीं पडला नाहीं तरी त्याची त्यांस परवा नसे. डौल दाखवायासाठीं मात्र ते त्यास विकत घेत.

त्या मूरानें व त्या तुर्कानें मिळून ती दोन्हीं मुलें विकत घेतलीं. तो तुर्की सेलीमास म्हणाला. 'तुम्ही मला ओळखतां? चला, या; आपले पैसे घ्या.' असें म्हणून तिमथ्यसाचा हात धरून त्याला आपले घरीं घेऊन जाऊं लागला. मूर-ही त्या व्यापाऱ्यास म्हणाला, 'तुम्ही या दुसऱ्या मुलाला माझ्या घरीं घेऊन या, म्हणजे मी त्याचेही पैसे देतों.' आपला आतां एकमेकांपासून वियोग होणार असें पाहून फिलेमोन मोठमोठ्यानें रडत तिमथ्यसाच्या गळ्यांत मिठी मारून म्हणाला, 'अरे माझ्या प्रिय तिमथ्यसा, माझा प्राण गेला तरी मी तुला सोडणार नाहीं. आपली प्रिय आई मेली व आपल्या बापापासून चोरानें आपणांस चोरून आणिलें. आतां, हे तिमथ्यसा तुजवांचून मला या जगांत कोण आहेरे! तुला माझ्यानें अगदीं सोडवत नाहीं. परमेश्वर आपला वियोग होऊं देणार नाहीं.'

पाच्छाची बायको खिडकींत उभी होती, तिला हीं दोन्हीं मुलें फार सुंदर व अगदीं एकमेकांसारखीं आहेत हें पाहून मोठा आनंद झाला, व त्या दोघांचा आकांत ऐकून तिचीं आंतडीं पिळून आलीं. तिनें त्या विकणाऱ्याकडे व त्या दोन विकत घेणाऱ्यांकडे आपल्या चाकराबरोबर असा निरोप पाठविला कीं, 'मी त्या दोन्ही मुलांस विकत घेतें; मला तीं विकत द्या.'

त्या तिघाजणांनीं खिडकीसमोर उभें राहून पाच्छाचे पत्नीस सलाम केला. सेलीमानें त्या मुलांस नेऊन पाच्छाच्या बायकोपुढें उभें केलें. तिनें त्याला जी किम्मत मिळावी असें वाटत होतें त्यापेक्षां अधिक दिली. सेलीमानें त्या मुलांची अखेरची भेट घेतली; पण त्याच्या डोळ्यांत पाण्याचा थेंब देखील आला नाहीं. उलट सौदा चांगला झाला ह्मणून त्याला फार आनंद झाला.

ती बाई त्या मुलांसंगतीं एकदम बोलूं लागली. व त्यांची हकीकत ऐकावी असें तिचे मनांत आल्यावरून तिनें त्यांस पुष्कळ प्रश्न केले. त्या मुलांनीं आपल्या-विषयीं जितकें त्यांस ठाऊक होतें तितकें सर्व तिला सांगितलें. जरी त्यांस तें तुर्की भाषेंत चांगलें सांगतां आलें नाहीं, तरी ती सर्व समजली. केव्हां केव्हां त्यांच्या चमत्कारिक शब्दांवरून तिला हसें येत असे. तिच्या पोटीं लेंकरूं नव्हतें म्हणून तिला लेंकरांची फार हौस होती. सबब तिणें त्या मुलांस दत्तक घेण्याचा निश्चय केला. कांहीं कामानिमित्त आपला नवरा सुलतानाच्या दरबारीं गेला होता, तो परत घरीं आल्यावर आपल्या म्हणण्यास रुकार देईल, असें तिला वाटलें.

तिणें त्या दोघा मुलांस गुलामाचा नीट नेटका मोल्यवान् तुर्की चालीचा पे-

ठराव घातला. जेव्हां त्यांस तुर्क लोकांचे लांब झगे घालून तिच्यापुढें आणिलें तेव्हां तिला मोठा आनंद झाला. 'हे जांभळे झगे त्यांच्या कुरळ्या केंसाला फार शोभतात,' असें ती म्हणाली. पण तीं मुलें फार दुःखित दिसलीं. त्यांस तो तुर्की पोषाख आवडेना म्हणून ती बाई त्यांला म्हणाली, 'बाळांनो, भिऊं नका. तुम्हांला मी तुर्की करणार नाहीं, व तुमच्या आईची आठवण तुम्हांस होऊं देणार नाहीं.

---

## प्रकरण ६.

## एलमानबाई.

पाच्छाच्या बायकोचें नांव एलमान होतें. ती फार चांगली व दयाळू होती व त्या मुलांची जणूं सख्खी आईच आपण असें दाखविण्यास तिनें फार प्रयत्न केला. तिनें त्यांस राहण्यास फार चांगली कोठडी देऊन, आपल्या दासींपैकीं एकीस त्यांचा सांभाळ व देखरेख करण्यास सांगितलें, व एका ख्रिस्ती गुलामास त्यांचे तैनातीस ठेविलें. ती वारंवार त्या मुलांस आपल्याकडे बोलावीत असे व जेव्हां ती आपल्याकडे बोलावीत असे व जेव्हां ती आपल्या मैत्रिणीबरोबर कशिदा काढीत बसे तेव्हां त्या मुलांस कर्मणुकीसाठीं आपल्याजवळ बोलावून ख्रिस्ती देशांत काय काय घडून आलें तें त्यांस विचारी, आणि त्यांच्या त्या बालभाषेंत गोष्टी ऐकून तिला मोठा आनंद होई.

एलमानबाई जेव्हां आपल्या सुंदर बागेंत जाई तेव्हां तीं मुलेंही तिजबरोबर जात. त्या बागेंत पुष्कळ तऱ्हेचीं फुलें होतीं तीं त्यांनीं आपल्या बापाच्या व त्यांचा शिक्षक जो अन्तोनियो याच्या बागेंत पाहिलीं होतीं. पण फार भडक रंगाचीं अशीं कित्येक अगदीं नवीन फुलें त्यांच्या येथें दृष्टीस पडलीं.

एलमानबाईच्या अपरोक्ष त्यांस त्या बागेंत व तेथील आंगणांत फिरण्याची मोकळीक होती, म्हणून त्या सुंदर व गुणी मुलांवर सर्वजण प्रीति करूं लागले. बागांतले बिगारी व महालांतले चाकर यांसही तीं मुलें फार आवडूं लागलीं. एलमानबाईनें बागेंतल्या तळ्यांत जे राजहंस पाळिले होते, ते देखील त्या मुलांस पाहून आनंदानें त्यांजपाशीं येत, कारण ते त्यांस भाकरीचे तुकडे टाकीत असत. पाच्छानें आपल्या महालांत जीं सुंदर कुत्रीं ठेविलीं होतीं तींही नाचत नाचत त्यांस भेटण्यास येत, कां तर तीं मुलें त्या कुत्र्यांस गोंजारून थोपटीत असत.

फिलेमोनानें प्रथमच हीं कुत्रीं पाहिलीं तेव्हां तो एका मोठया लचांडांत प-डायाच्या लागांत आला होता, कारण त्यांतील एक कुत्रा पाहून तो ह्मणाला कीं, 'असाच एक कुत्रा आमच्या आंगणांत आहे व त्याचें नांव सुलतान.' बरें झालें कीं हें त्यांचें बोलणें एका खिस्ती माणसानें मात्र ऐकिलें. त्यानें एकतांच त्याला सुचविलें कीं, "पुन्हां असें कधीं बोलूं नको. कारण तुर्कस्थानाचा जो बादशहा त्याचा किताब 'सुलतान' आहे. त्या नांवानें या कुत्र्यास हाक मारितोस असें जर एखादा तुर्कानें ऐकिलें तर तो तुझें डोकें मारील." त्या मुलांस त्या महालांत राहण्यास बरें वाटूं लागलें तेव्हां एलमानबाईनें जो खिस्ती गुलाम हा वेळपर्यंत त्यांच्या तैनातीस ठेवला होता व जो फार हुशार असून बहूत दिवस तुर्की लोकांत राहिला होता त्याला त्या मुलांस लिहिणें, वाचणें व गणित शिकविण्यास सांगितलें. असें पाहून त्या गुलामाला मोठा आनंद झाला. तो त्यांस फक्त शिकवूनच स्वस्थ बसत नसे, तर त्यांच्याबरोबर देवाविषयीं व प्रभु येशूखिस्ताविषयीं ही बोले.

एका सकाळीं एलमानबाईचे मनांत त्या मुलांला भेटावें असें आलें. त्यांच्या खोलीचें दार अर्धमुर्धं लावलेलें होतें व आंत दोन्ही मुलें मध्यभागीं गुढघे टेंकून प्रार्थना करूं लागलीं कीं 'हे आमच्या आकाशांतील प्रिय बापा, तूं आमची दुसरी आई एलमानबाई जी आम्हावर फार प्रीति करिते तिजवर आशीर्वाद पाठीव. तुझा प्रिय पुत्र जो प्रभु येशू खीस्त याचें ज्ञान तिला प्राप्त होऊन त्याच्याकडून तिचें तारण व्हावें असें आम्ही तुला विनवितों !

हे शब्द एलमानबाईच्या अंतःकरणांत फार ठसले. तिणें त्या मुलांस वारंवार खिस्तीधर्माविषयीं विचारिलें होतें; आणि त्यांनींही तिला त्याविषयीं कांहीं सांगितलें होतें. पण ती तें बरोबर समजली नव्हती. एका दिवशीं सकाळीं ती म्हणाली, 'माझे मनांत फार आहे कीं कोणापासून तरी या धर्माविषयीं अधिक विचारून घ्यावें.' हें ऐकून, तीं मुलें बोललीं, 'आईसाहेब, या कामास फार लायक असा एक माणूस आमच्या ओळखीचा आहे व तो मिळण्यासारखाही आहे; तो कोण ह्मणाल तर, ज्या माळ्याविषयीं आम्ही तुम्हास पुष्कळ वेळां सांगितलें तोच. तो फार विद्वान असून खिस्ती उपदेशक आहे.' एलमानबाई म्हणाली, 'ठीक; मी त्याला येथें आणवीन. पण तो खिस्ती उपदेशक आहे असें, कोणापाशीं बोलूं नका. नाहींतर, तुर्क लोक त्याच्या गळ्याला फांस घालतील व तो बिचारा आपल्या जिवास मुकेल.'

ह्या गोष्टीस सुमारें १५ दिवस लोटल्यावर त्या बागांत पुन्हा जत्रा भरली. तेव्हां एलमानबाईनें सेलीम व्यापाऱ्यास बोलावून सांगितलें कीं, 'जीं दोन ख्रिस्ती मुलें मला विकत दिलींस त्यांकरितां मी तुझी फार आभारी आहें. त्या मुलांस पाहून मला मोठा आनंद होतो. आतां माझे मनांत आमचा बाग चांगल्या स्थितींत आणावयाचा आहे म्हणून तुला दुसरी कामगिरी सांगण्याचें माझ्या मनांत आहे. ख्रिस्ती लोकांस बागेचें काम आपल्या लोकांपेक्षां चांगलें समजतें, याकरितां, तूं या कामांत चतुर असा कोणी ख्रिस्ती गुलाम पाहाशील तर बरें होईल.'

या स्तुत्य भाषणावरून सेलीम फार खूष होऊन ह्मणाला; 'एक माणूस मला ठाऊक आहे व तो माळीपणाच्या कामांत फार निपुण आहे, पण तो मिळण्याची मुष्कील आहे; कारण तो एका श्रीमंताचा गुलाम आहे.' एलमानबाई म्हणाली, 'कांहीं चिंता नाहीं, जी किम्मत पडेल ती पडो, त्याला विकत घे. त्या श्रीमंताला सांग कीं, मला तो माणूस पाहिजे म्हणजे त्या माणसाला देण्यास तो श्रीमंत गृहस्थ काणकूण करणार नाहीं.'

सेलीम घरीं आल्याबरोबर इब्राहिमाकडे जाऊन त्याचा गुलाम त्यानें विकत मागितला. तें ऐकून त्यानें सेलिमास झिटकारून मोठ्या रागानें ह्मटलें, 'तो गुलाम मी तुला विकत देत नाहीं.' इब्राहिमानें उसासा टाकून ह्मटलें, 'तुला काय वाटतें? तो इतका चांगला व उपयोगी मनुष्य असून बागेचें काम फारच उत्तम करितो. यासाठीं, कोणी मला एक लाख रुपये दिले तरी त्याला विकण्याची माझी इच्छा नाहीं.'

पण जेव्हां इब्राहिमानें ऐकिलें कीं तो पाच्छाच्या पत्नीस पाहिजे तेव्हां नाहीं ह्मणून काय उपयोग. सेलीम अन्तोनियसाला बरोबर घेऊन पाच्छाच्या महालीं आल्यावर कारभाऱ्यानें त्याला एलमानबाईकडे नेलें. अन्तोनियसाचीं कापडें जरी नीटनेटकीं नव्हतीं, तरी त्याचें भव्यस्वरूप पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें व तिनें कारभाऱ्याला सेलीमाचे पैसे देण्याचा हुकूम करून सांगितलें कीं, 'सेलीम गेला म्हणजे त्या दोन मुलांस घेऊन ये.' सेलीम गेला तशी एलमानबाई अन्तोनियसास ह्मणाली, 'कायहो बोवा, तिमथ्यस व फिलेमोन जे तुमचे लहान शिष्य तुह्मावर बापाप्रमाणें प्रीति करितात, त्यांनीं, मला तुह्मांविषयीं पुष्कळ सांगितलें. ज्या गोष्टीची काळजी मला लागली आहे, व जिजविषयीं सर्व जगांतील लोकांनींही काळजी बाळगावी अशी जी अगत्याची

गोष्ट तिचें मला तुमच्यासारख्या ख्रिस्ती मनुष्याकडून ज्ञान होईल तर मोठे उपकार होतील.

अन्तोनियसानें आपले डोळे व हात वर करून म्हटलें; 'हे दयाळू देवा, तूं या मुलांच्या हातून केवढया भारी गोष्टी घडवितोस !' इतक्यांत दोन्ही मुलें ज्या खोलींत अन्तोनियस बसला होता तेथें आलीं; त्याला पाहून मुलांस अत्यानंद झाला व तीं मोठयानें म्हणालीं, 'हे अन्तोनियसा, तूं आमचा गुरु, मागल्या गांवीं होतास तेव्हां त्वां आम्हांस आमच्या बापाची आठवण होऊं दिली नाहीं. पुनरपि तुझी व आमची भेट झाली म्हणून आम्हीं ईश्वराचे उपकार मानितों.'

एलमानबाईनें त्याला माळ्याचाच पण उत्तम पोषाख देण्यास हुकूम केला. ती वारंवार मुलांसहित बागेंत जाऊन त्याशीं बोलत बसे. तेथील तुर्की लोकांस असें वाटे कीं, ती आपल्या बागेच्या सुधारणुकीविषयीं त्याशीं बोलत असेल; परंतु वास्तविक पाहिलें असतां या मृत्युलोकांतील बागेविषयीं नव्हे तर आकाशाच्या राज्यांतील जो शोभिवंत बाग त्याविषयीं ती बोलत असे. तीं जेव्हां एकमेकांस भेटत तेव्हां तीं देवाविषयीं व जो तारणारा देवानें पाठविला त्याविषयीं बोलत. अन्तोनियसानें जो बोध तिला केला त्यावरून तिच्या अंतःकरणांत नवा प्रकाश पडून ती बाई ख्रिस्ती झाली; तिनें ख्रिस्तावरील आपला विश्वास मोठया प्रीतीनें जाहीर करून बागेंत त्या दोन्ही ख्रिस्ती मुलांदेखत व आणखी दोन ख्रिस्ती गुलामांदेखत त्या सन्मान्य उपदेशकाच्या हातून बाप्तिस्मा घेतला.

बाप्तिस्म्याच्या वेळीं तिचे इच्छेवरून आलीसाबेथ हें नांव तिला दिलें. हंगारी देशांतील जगत्प्रसिद्ध लॅंडग्रेव्हीन जी, आलिसाबेथ साध्वी तिची हकीकत अन्तोनियसानें तिला सांगितली होती. त्या साध्वीच्या ठायीं नम्रता, सौम्यता, सहनशीलता व गरीबांची दया इतकी होती कीं, अन्तोनियसाच्या मतें तिचा कित्ता सर्व ख्रिस्ती राजकन्यांनीं घ्यावा म्हणूनच एलमानबाईनें आलिसाबेथ हें नांव पसंत केलें. त्या योगानें तिला नेहमीं त्या साध्वीच्या उत्तम उदाहरणाची आठवण होऊन तिच्या सत्कर्मांचें अनुकरण करावें असें वाटे.

---

# प्रकरण ७.

## लढाईंतला कैदी.

एलमानबाईनें त्या दोन मुलांस आपल्या हवेलींत ठेविलें. अन्तोनियसास तिनें आपल्या बागेचाच नुस्ता कारभारी करून ठेविलें नाहीं, तर त्याला आपल्या आत्म्याचा पाळकही करून ठेविलें. या वेळेस तिचा नवरा पाच्छा यास कन्स्तांतिनोपल येथें कांहीं दिवस रहावें लागलें होतें; कारण सुलतान ख्रिस्ती लोकांवर नवी स्वारी करण्याच्या तयारींत असल्यामुळें त्यानें लढाईच्या मसलतीसाठीं आपल्या सर्व पाच्छांस बोलावून आपणाजवळ ठेविलें होतें. एलमानबाईच्या नवऱ्याला त्या स्वारीचें सेनापतित्व दिलें होतें. लढाई सुरू होतांच पाच्छानें आपल्या बायकोस त्याविषयीं लिहून पाठविलें. हें वर्तमान ऐकून तिला व तिच्या ख्रिस्ती मित्रांस फार वाईट वाटलें. पण, पाच्छाच्या हवेलींतील इतर कामगारांस व नगरांतील सर्व लोकांस मोठा आनंद झाला. सुलतानाची फौज तिकडे दूर हंगारी प्रांतावर स्वारी करून गेली. पाच्छाच्या नगरांतील माणसें उगीच बसलीं नव्हतीं. त्यांनींही एका ठिकाणीं जमून आपल्या देशाच्या सरहद्दी पार जाऊन तेथील खेडींपाडीं व गांवें यांवर पडून त्यांचा विध्वंस केला व गुरें हाकून घरेंदारें जाळून टाकून फार नाश केला व ख्रिस्ती लोकांस कैद करून त्यांस आपल्याबरोबर घेऊन पुन्हा तुर्कस्थानांत माघारे आले.

ते माघारे आल्यावर कित्येक कैद्यांस विकण्याकरितां पाच्छाच्या महालासमोर बाजारांत मोठ्या जयजयकारानें घेऊन आले. त्यांस पाहून शहरांतील लोकांचा मोठा मेळा त्यांचेभोंवतीं जमा झाला. हा गलका ऐकून एलमानबाई व तीं दोन मुलें घाईनें येऊन, काय आहे म्हणून, खिडकी उघडून पाहूं लागलीं, तेव्हां अकस्मात् त्या कैद्यांत त्या मुलांनीं आपला बाप कैदी आहे असें पाहिलें. तेव्हां लागलीच त्यांनीं मोठ्यानें एकदम बाबा अशी हाक मारली ती ऐकून तो वर पाहूं लागला तों तुर्की पोषाख केलेलीं दोन मुलें त्याच्या दृष्टीस पडलीं. पण तीं कोणाला हाक मारतात हें तो समजला नाहीं. तीं मुलें घाईघाईनें खालीं उतरलीं व लोकांच्या दाटींत पाहूं लागलीं. लोकांनींही त्यांस वाट दिली तेव्हां त्यांनीं आपल्या बापाजवळ जाऊन त्याचे पाय घट्ट धरिले. बापानें प्रथम त्यांस ओळखलें नाहीं. मुलें म्हणालीं, 'हे बाबा,

तूं आह्मांस ओळखत नाहींस. काय? ' एक म्हणाला ' मी तुझा तिमथ्यस;' दुसरा म्हणाला ' मी तुझा फिलेमोन.' हें ऐकून बापाला मोठा गहिंवर येऊन तो मोठ्यानें रडून ह्मणूं लागला, 'हे परमेश्वरा! ह्या मुलांची व माझी भेट झाली म्हणून, मी तुझे फार उपकार मानितों.' त्या मुलांस पाहून त्याला इतका आनंद झाला कीं, आपण कैदी आहोंत, व आपल्या हातांपायांत बेडया आहेत याचा त्याला विसर पडला. जे लोक तेथें जमले होते, त्यांस मोठें नवल वाटून, त्यांतून कित्येकांच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या व हा चमत्कार पाहण्यास आपल्या मित्रांस जवळ बोलावून ह्मणाले ' हा या सुंदर मुलांचा बाप व हीं त्याचीं मुलें' !

एलमानबाईनें चाकरांस पाठवून असा हुकूम केला कीं, ' हा कैदी माझ्या स्वाधीन करावा;' तेव्हां शिपायांनीं त्याला तिजकडे आणिलें. तिनें शिपायांस बराच पैसा देऊन सांगितलें कीं, 'पाच्छा माघारा आल्यावर तुमच्या शूरत्वाबद्दल तुह्मांस आणखी खुष करील. सध्यां येवढा पैका घ्या.' त्या मुलांनीं हात जोडून अशी विनंति केली कीं, ' बाईसाहेब, आमच्या बापाच्या बेडया काढण्याचा हुकूम व्हावा.' तिनें ती गोष्ट मान्य केली. शिपाई लोक बेडया काढून चालते झाले. मुलांचे डोळे एकसारखे आपल्या बापाकडेस लागले होते. त्याच्यावर म्हातारपणाची कळा येत आहे हें पाहून मुलांस फार वाईट वाटलें. मुलें चोरीस गेल्यामुळें तो फार हळहळत होता. तें सर्व त्याच्या मुखचर्येवरून स्पष्ट दिसत होतें.

त्यांचा बाप जरी दुःखित होता तरी त्या मुलांस पाहून त्याला आनंद झाला. त्यांच्या आंगावर छानदार तुर्की पोषाख पाहून त्याला मोठें नवल वाटलें, व असा संशय आला कीं, हीं मुलें मुसलमान झालीं असावींत हें एलमानबाईच्या लक्षांत लागलेंच आलें व ती ह्मणाली, ' घाबरूं नको; वाईट वाटण्यास कांहीं कारण नाहीं, मीही स्वतः ख्रिस्ती आहें. ईश्वरानें या तुझ्या चांगल्या मुलांच्या द्वारें येशूख्रिस्ताविषयीं मला बोध केला; इतक्यांत अन्तोनियस खोलींत आला. तेव्हां त्याकडे बोट दाखवून त्या मुलांच्या बापाला म्हणाली कीं, हाही धार्मिक ख्रिस्ती असून माझा व तुझ्या दोन्ही मुलांचा शिक्षक आहे. अशा सद्गुणी मुलांच्या बापाची व माझी ओळख झाली ह्मणून, मी आपलें दैव मोठें असें समजतें.' यावरून त्या बापाला फार आनंद झाला. त्यानें मोठ्यानें ईश्वराचे उपकार मानून त्याची स्तुति केली. एलमानबाईनें तीं दोन मुलें व अन्तोनियस यांना

ईश्वरानें कसा बचाव केला तें सविस्तर लूसियसाला सांगितलें. लूसियस तेथें पुष्कळ दिवस सुखानें राहिला. सर्व लोक देवाच्या चांगुलपणाची प्रशंसा करून आनंद करिते झाले.

अशा स्थितींत लूसियस होता तरी आपल्या दोन पुत्रांस घेऊन स्वदेशीं जावयाची इच्छा त्याला झाली. कारण हवेलींतील सर्व तुर्क लोक त्या ख्रिस्त लोकांकडेस पाहून कपाळास आठ्या घालीत व त्यांच्यावर दांतओंठ खात पण, घरधनिणीला वचकत. म्हणून लूसियसानें एलमानबाईपाशीं आपल्या पुत्रांसुद्धां स्वदेशीं परत जाण्याची परवानगी मागितली. तिनें उत्तर दिलें कीं, 'जोंपर्यंत लढाई चालली आहे तोंपर्यंत जाणें सुरक्षित नाहीं, गेलां तर तुम्हांस पुष्कळ संकटें प्राप्त होतील. स्वस्थता होतांच, मी तुम्हांस तुमच्या देशीं परत पाठवीन व लढाईमुळें जें तुमचें नुकसान झालें तें सर्व मी भरून देईन.' हें तिचें म्हणणें खरें असें त्यास वाटून त्यानें तिचे उपकार मानिले; तरी पुनः तो म्हणाला, "मला येथें उद्योगावांचून खालीं बसणें बरें दिसत नाहीं."

हा वेळपर्यंत, कधीं कधीं, त्यानें बागेंत जाऊन फुलझाडें लावावीं. व दुसरींही बागेसंबंधी कामें करावीं. अशा रीतीनें तो आपली करमणूक करून घेत असे. पण, आतां त्यानें अशी विनंति केली कीं, 'मला अन्तोनियसाच्या हाताखालीं ठेवावें.' हें त्याचें म्हणणें तिनें आनंदानें मान्य केलें. ही परवानगी त्याला मिळाल्याबरोबर लूसियस बागेंत राहण्यास गेला. आपण एकाच ठिकाणीं आलों व आपलें दोघांचें काम एकच असल्यामुळें आपणास प्रार्थना करण्यास बरें पडेल; हें पाहून त्या उभयतांस फार आनंद झाला.

---

## प्रकरण ८.

### पाच्छा.

बहुत दिवसांनंतर पाच्छा अकस्मात घरीं आला, कारण, तुर्क लोक एका मोठ्या लढाईंत हटल्यामुळें त्यांस लढाई तहकूब ठेवणें भाग पडलें. पाच्छा आपले सरदार, शिपाई यांसहित रस्त्यांतून माघारा येत असतां लोकांनीं धांवून मोठ्या जयजयकारानें त्याला सलाम केला. पण तो फार कातावलेला दिसून ख्रिस्ती लोकांस शाप देत होता. हवेलींत जाण्यापूर्वीं त्याच्या चाकरांनीं त्याला सांगितलें कीं, माहाराज एक ख्रिस्ती शिक्षक माळ्याचा वेष घेऊन आपल्या

हवेलींत घुसून बसला आहे; त्यानें आपल्या पत्नीकडून महंमदी धर्माचा त्याग करण्याविषयीं शपथ घेतली आहे. दुसऱ्या एका ख्रिस्ती माणसास आपल्या शूर शिपायांनीं लढाईंत धरून गुलाम केलें; त्यालाही तुमच्या पत्नीनें आपल्याजवळ ठेवून घेतलें आहे व तो ख्रिस्तीही तिला तिच्या इमानापासून फिरवायास प्रयत्न करीत आहे. पहा तो ख्रिस्ती तिकडून जात आहे. ह्या दोन ख्रिस्ती माणसांवर बाईसाहेबांचा विशेष भरंवसा आहे. त्या आम्हा तुर्क लोकांला अगदीं कसपटाप्रमाणें लेखितात. बाईसाहेब तर आतांशीं ख्रिस्तीस्त्रियांप्रमाणें वागतात. त्यांस आपली तुर्की रीत अगदीं आवडत नाहीं. जो माणूस मी आतां आपणास दाखविला त्याच्या दोन्ही मुलांस त्यांनीं दत्तक घेतलें आहे.'

हें ऐकून तर पाच्छाचा राग फारच पेटला, व तो अगदीं वेडयासारखा पायऱ्यांवर इकडे तिकडे फिरूं लागला. इतक्यांत, त्याची पत्नी हसत हसत त्याला आलिंगन देण्यासाठीं सामोरी आली. तिचें हास्यमुख पाहून तो अंमळ शांत होऊन ह्मणाला 'मी ऐकतों कीं, तूं ख्रिस्ती झालीस हें खरें काय?' तिणें उत्तर दिलें कीं, 'होय मी ख्रिस्ती झालें; ख्रिस्तावर विश्वास ठेवण्यास मला फार आनंद वाटतो.'

असें ऐकतांच पाच्छानें मोठया रागाच्या झपाटयानें आपली तरवार तिचें डोकें उडविण्यास म्यानांतून उपसली. पण एक सरदार त्याच्याबरोबर होता, त्यानें मोठया प्रयासानें त्याचा हात झटकन धरून त्याला मागें हटविला व ह्मणाला, 'हें आपण काय करतां ? तिला याविषयीं विचार करण्यास कांहीं वेळ द्या. माझी पक्की खातरी आहे कीं, ती लवकरच शुद्धीवर येईल. आपले काजी मुल्ला यांस, तिला कसा बोध करावा याविषयीं उत्तम माहीत आहे. ख्रिस्ती लोकांच्या कावेबाजीनें व भुलथापीनें ही बिचारी बाई बहकली आहे. हें आपलें वेडेपण आहे अशी तिची खात्री लवकरच होईल व तसें झालें ह्मणजे ती शुद्धीवर येईल.'

पाच्छा ह्मणाला, बरें, तसें करा. तिला या गोष्टीचा विचार करण्यास तीन दिवसांची मुदत देतों. आतां तिला तिच्या खोलींत न्या आणि तेथें तिजवर पहारा ठेवून चांगला बंदोबस्त ठेवा. पण त्या ख्रिस्ती उपदेशकास व त्या दुसऱ्या ख्रिस्ती माणसांस एकदम कैद करा व तीन दिवसांच्या आंत त्यांची कांहीं दया नकरितां त्यांस ठार मारून टाका.'

त्या बाईस तिच्या खोलींत कैद करून दरवाजावर पहारा ठेवला; आणि त्या सन्मान्य उपदेशकास व त्या दोन मुलांच्या बापाला कैदेंत टाकिलें.

तिमथ्यस व फिलेमोन यांनीं जेव्हां ऐकिलें कीं, आपल्या बापाला तीन दिवसांच्या आंत जिवें मारणार, तेव्हां ते फार घाबरले. हवेलींतील सर्व माणसांस त्यांचा कळवळा येऊं लागला. इतर खिस्ती गुलाम त्यांजवर फारच प्रीति करीत; कारण त्या मुलांनीं त्यांजवर अनेक वेळीं दया करून त्यांचे धनिणीस अर्ज करून त्यांजवर पुष्कळ उपकार केले होते. तुर्की लोक त्यांचा मनमिळाऊ स्वभाव पाहून त्यांजवर प्रीति करीत, आणि आपापल्यांत असें बोलत कीं, ' हीं दोन्ही मुलें फार हुशार दिसतात. पुढें तुर्की लोकांत हीं मोठीं शूर निघतील बरें ' ह्या सर्व लोकांनीं होईल तितकें त्यांचें समाधान केलें व म्हणाले; 'पाच्छानें तुह्मांसही मारण्याचा हुकूम दिला नाहीं ह्मणून, तुमचें नशीब थोर असें समजा. तुमचें भाग्य खचित मोठें म्हणून तुमची पाळी चुकली पण बाबानों, जपा, त्याच्या नजरेस सुद्धां पडूं नका; नाहींतर तुमचेंही डोकें उडविलें जाईल. '

हीं दोन्ही मुलें आपल्या खोलींत गेलीं आणि गुडघे टेंकून हात जोडून वर आकाशाकडे पाहून अशी प्रार्थना करूं लागली कीं ' हे करुणाकर कृपासागरा परमेश्वरा, आमच्या प्रियकर बापावर व आमच्या प्रिय उपदेशकावर व मायाळू एलमानबाईवर कृपा करून त्यांस वांचीव. हे बापा, तूं असें करण्यास समर्थ आहेस. ' अशी प्रार्थना करितांना त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या. ते पवित्रशास्त्रांतल्या वचनांवरून एकमेकांचें समाधान करूं लागले; विशेषेंकरून दाविदाच्या वचनांपैकीं धार्मिक अन्तोनियस "नीतिमानाचे कष्ट बहुत आहेत, परंतु त्या सर्वांतून परमेश्वर त्याला सोडतो." गीतें ३४. १९ हें वचन नित्य त्यांस बोलून दाखवित असे. त्यावरून ते एकमेकांचें शांतवन करूं लागले, मग पुन: प्रार्थना करून शास्त्रांतील उत्तम उत्तम वाक्यांवरून समाधानकारक जीं कांहीं वाक्यें त्यांनीं तोंडपाठ केलीं होतीं त्यांविषयीं ते विचार करूं लागले तेणेंकरून त्यांच्या अंत:करणांत अमळ शांति उत्पन्न होऊन, काय होईल व काय न होईल याची जरी त्यांस खातरी नव्हती तरी, ईश्वर आपला व आपल्या बापाचा बचाव करील अशी त्यांस आशा उत्पन्न झाली.

---

# प्रकरण ९.

## पलायन.

त्या दोन्ही मुलांची फार इच्छा होती कीं, तुरुंगांत जाऊन आपल्या बापास भेटावें. जो शिपाई पहाऱ्यावर होता तो जातीचा तुर्क होता खरा; पण त्याचें मन ख्रिस्ती धर्माकडे वळलें असून केवळ पाच्छाचे भीतीस्तव तो आपले धर्मविचार कोणास कळवीत नसे. आपणास एक वेळ तरी बापाच्या खोलींत जाऊं द्यावें म्हणून त्यास मुलांनीं विनंति केली.

तो म्हणाला कीं, 'तुमच्या ह्मणण्याप्रमाणें मी करीन; पण तुम्ही गुपचुप जाऊन आपल्या बापाची भेट घ्या; आतां जा, व उद्यां रात्रीं जेव्हां माझी पहारा करण्याची पाळी येईल त्या वेळीं तुह्मी या.' त्यानें आपल्या पहाऱ्याची वेळही त्यांस सांगितली.

तीं दोन्ही मुलें तेथून निघून जेथें त्यांचा धार्मिक उपदेशक कैदेंत होता तेथें गेलीं. तेथल्या दरवाज्यावर एक शिपाई पहाऱ्यावर होता. आपणास उपदेशकांची भेट घेऊं द्यावी म्हणून त्यांनीं त्याची पुष्कळ विनवणी केली. पण त्या शिपायानें त्यांस मोठ्या रागानें व दांडगाईनें धमकावून मागें हटविलें. मग ते एलमानबाईच्या खोलीजवळ गेले. तिच्या दारापाशीं तर दोन शिपाई नागव्या तरवारी घेऊन पहारा करीत होते. त्या मुलांनीं भीत भीत मोठ्या मर्यादेनें आपणास आंत जाण्यास परवानगी मिळावी म्हणून विनंति केली. पण एक शिपाई मोठ्या निर्दयपणानें म्हणाला; 'तें कांहीं चालणार नाहीं. कोणासही भेटण्याची परवानगी नाहीं असें आम्हांस पाच्छानें ताकीद देऊन सांगितलें आहे.' दुसरा तर आपली तरवार त्यांच्या डोक्याकडे चमकावून मोठ्यानें ओरडून ह्मणाला, 'येथून चालते व्हा. नाहीं तर आतांच तुमचीं डोकीं उडवीन.' तेव्हां ते मोठ्या दुःखानें व भयानें मागें आले. मग संध्याकाळ झाल्यावर पहिल्या शिपायानें सांगितल्या वेळीं ते हळूच आपल्या बापाच्या अंधारकोठडींत शिरले. तो तुरुंग पाच्छाच्या हवेलीला लागून होता व हवेलींतून त्यांत येण्यास एक लहानसा रस्ता होता. त्या शिपायानें पहाऱ्यावर जो दिवा जळत होता त्या दिव्यावर एक बत्ती लावून ती त्या मुलांच्या हातीं देऊन तुरुंगाचें दार उघडून त्यांस आंत जाऊं दिलें. त्यांचा बाप ज्या अंधार कोठडींत बसला होता त्या खोलींत यांच्या दिव्याचा उजेड किंचित पडला. दोन्ही मुलांनीं जाऊन

बापाच्या पुढें गुढघे टेंकिले व दुसऱ्या दिवशीं आपल्या बापास परलोकीं जावें लागणार याची जेव्हां त्यांस आठवण झाली तेव्हां ते धायधाय रडूं लागले.

पण तो ह्मणाला, 'माझ्या लाडक्यांनो, रडूं नका; ईश्वरानें जें कांहीं नेमिलें आहे, तेंच होईल. त्याच्या इच्छेवांचून माझ्या डोक्याच्या केंसासही धक्का लागणार नाहीं. जर परमेश्वरानें मी मरावें असें ठरविलें असेल तर त्याच्या इच्छेप्रमाणें होवो. कां कीं, तेणेंकरून त्याचा प्रियपुत्र जो येशू ख्रीस्त त्यावरचा विश्वास माझ्या रक्तपाताच्या योगानें दाखवितां येईल.' मुलें म्हणालीं, 'आह्मी उभयतांही तसें करण्यास तयार आहों. पण बाबा, ह्या क्रूर पाच्छाच्या हातानें तुझा वध तूं कां होऊं देतोस? ह्या तुर्क लोकांस आपल्याला गुलाम करण्याचा कांहीं हक्क नाहीं. तर येथून पळावें हें बरें; व तुला हें सहज साधेल. जो तुर्की शिपाई येथें पहारा करीत आहे तो फार सुस्त व झोंपाळू आहे. तो पहारा न करितां जमिनीवर स्वस्थ बसून राहिला आहे. तेव्हां लवकरच त्याला झोंप लागेल. असें झालें असतां येथून आपण सहज निसटून जाऊं. बागांतून शेताकडे जाण्याची जी वाट आहे, ती आम्हास ठाऊक आहे.' बापास त्यांची मसलत आवडली. त्या मुलांतून एकजण हळूच दारापाशीं जाऊन मागें आला आणि अगदीं हळू सांगूं लागला कीं, 'पहारेकरी झोंपी जाऊन मोठ्यानें घोरत आहे. चला, झटकन् निघून जाऊं.' त्यांचा बाप म्हणाला; 'बरें, ईश्वर आपल्यास सहाय होवो. ह्या प्रांतांची मला बरीच माहिती आहे. आपल्यास दोन मोठाले पर्वत उतरून जावयाचें आहे. मग आपल्यास मोठें जंगल लागेल. तें संपल्यावर लवकरच ईश्वरी साहाय्यानें आपण ख्रिस्ती देशाच्या सरहद्दीवर पोंचूं.'

असें बोलून ते निसटले. त्या वेळीं चांदणें शुभ्र फटफटीत पडलें होतें म्हणून ते पहिला डोंगर लौकरच उतरून गेले. तो उतरतांना त्यांस दाट झाडीच्या अरण्यांतून व कडयांवरून जावें लागलें. इतक्यांत दिशा उजळल्या. पुढें एका दऱ्यांतील रुंद सपाटीची वाट मिळाल्यामुळें त्यांस पुढें जाण्याचें अंमळ सोपें झालें व ते दुसऱ्या डोंगराच्या जवळ जवळ येऊन ठेपले. पण तेथें आल्यावर पारध्याच्या शिंगांचा नाद व घोडयांच्या खुंबांचा आवाज व कुत्र्यांचें भोंकणें त्यांच्या कानीं पडूं लागलें.

मुलें म्हणालीं, 'हा नाद शिकारीचा दिसतो.' बापानें उत्तर दिलें, 'मला वाटतें कीं ते पाच्छाचे लोक असावेत. व हे त्याचे स्वार त्यानें आपल्याला

पकडण्याकरितां पाठविले असावे. ते निघून जात तोंपर्यंत आपल्याला लपून राहिलें पाहिजे.' इतक्यांत त्यांनीं डोंगराच्या बाजूस एक गुहा पाहिली. तिचें दार दाट झुडपांनीं व गवतानें अगदीं झांकून गेलें होतें. तींत ते जाऊन लपून बसले. स्वारही त्या खोऱ्याच्या जवळ जवळ येत चालले. हें पाहून, बापानें त्या गुहेंत गुडघे टेंकून अशी प्रार्थना केली कीं, 'हे दयाळू परमेश्वरा, ह्या माझ्या मुलांचा बचाव कर.' त्याला असा धाक पडला होता कीं, पाच्छा रागाच्या झपाट्यांत या गरीब बिचाऱ्या निर्दोष लेंकरांनाही मारून टाकील. हें पाहून त्या मुलांनींही त्याचेजवळ गुडघे टेंकून व हात वर करून अशी प्रार्थना केली कीं, 'हे सर्वोत्तमा, असें क्रूर मरण आमच्या प्रिय बापास न येतां आम्हां दोघांसच येईल तर उत्तम. त्याच्या जिवाबद्दल आमचा जीव घे.' अशी लेंकरांची प्रीति पाहून बापाचे नेत्रांतून अश्रुधारा चालल्या.

तो आपल्या मनांत म्हणाला, 'मी जरी गरीब माणूस आहें तरी मी फार सुखी आहें. पाच्छापेक्षां इतकेंच नव्हे; तर सुलतानापेक्षांही माझें भाग्य थोर!' लौकरच घोडयांच्या सुंबांचा व कुत्र्यांच्या भोंकण्याचा आवाज बराच दूर गेला असें त्यांस वाटूं लागलें. तेव्हां मुलें ह्मणालीं, 'ईश्वराची स्तुति असो; आतां आपणास पुढें निघून जातां येईल.' बाप म्हणाला, 'आपण पार पडलों असें इतक्यांतच समजूं नये.' असें ह्मणून गुहेंत जें गवत वाढलें होतें त्यावर तो बसला व त्याचीं मुलेंही त्याच्याजवळ बसलीं. डोंगर चढून आल्यानें त्यांस मोठा शीण वाटूं लागला. मुलें भुकेनें व्याकूळ झालीं. कां तर, पूर्वदिवशीं व त्या रात्रींही दुःखी असल्या कारणानें त्यांच्यानें कांहीं खाववलें नाहीं. पण पाच्छाच्या घरीं रात्रीं जेवतांना त्यांनीं थोडीशी भाकर व कांहीं अंजीर आपल्या बापास तुरुंगांत आणून देण्याकरितां आपल्या खिशांत ठेविले होते. त्यांस ठाऊक होतें कीं, त्या दिवशीं बापाला पाणी व भाकरीचा कुटका मात्र मिळाला होता. ती भाकर व ते अंजीर खिशांतून काढून बापाला ह्मणालीं. 'बाबा, ही चांगली भाकर व अंजीर तूं खा.' बाप म्हणाला 'माझ्या लाडक्यांनो, तुम्हींच ती खा, मला अगदीं भूक नाहीं.' असें म्हणतांना त्याचे डोळे भरून आले. तिमथ्यस म्हणाला 'बाबा तुला खालेंच पाहिजे. पाहा, आमच्या खिशांत आणखी अंजीर व भाकर आहे.' असें म्हणून एक भाकर व दोन अंजीर खिशांतून काढून गवतावर ठेविले. पण बाप म्हणाला, 'माझ्या प्रिय मुलांनो, तुम्हींच तें खा व जें राहील तें जपून ठेवा म्हणजे तमच्याच तें पटें उपयोगीं

पडेल. कारण आपणास अजून बरीच मजल मारावयाची आहे व ती पुरी होईपर्यंत दुसरें कांहीं खाण्यास मिळण्याचा संभव नाहीं.' फिलेमोन ह्मणाला, 'बाबा, जर तूं खात नाहींस तर आम्हीही खात नाहीं.' असें म्हणून मुलांनीं ती भाकर व अंजीर एकीकडे ठेविले. बाप ह्मणाला, 'बरें तर आपण सर्वजण खाऊं; पण खाण्यापूर्वी जें अन्न ईश्वरानें दया करून आपणांस दिलें आहे त्याबद्दल त्याचे आभार मानूं.' हें थोडेंसें जेवण जेवीत असतां पहांट झाली. तिमथ्यस ह्मणाला, 'ईश्वरानें हा प्रातःकाळचा उजेड आपणांस दाखविला आहे त्याची आपणावर केवढी कृपा आहे.'

फिलेमोन ह्मणाला, 'माणसें असा प्रातःकाळचा प्रकाश पहात असतांना एकमेकांशीं निर्दयपणें कशीं वर्ततात व त्यांच्यानें क्रूर होऊन एकमेकांचा जीव कसा घेववतो.' बाप म्हणाला, 'ईश्वरानें असा सुखदायक सकाळचा उजेड आपणांस दाखविला आहे ह्मणून, त्याचे उपकार मानावे; व जसा तो आपल्या सूर्याचा चांगले व वाईट या दोहोंवर सारखा उदय होऊं देतो त्याप्रमाणेंच आपले मित्र व शत्रु या दोहोंवरही आपण प्रीति करण्याचा यत्न करावा.'

---

## प्रकरण १०.

### नवीन संकटें.

असें त्याचें बोलणें होत आहे इतक्यांत शिकाऱ्याच्या शिंगाचा आवाज त्यांस ऐकूं आला. त्यावरून पहिल्यापेक्षां शिकारी फारच जवळ आले आहेत असें वाटलें. पाच्छा याच मुलुखांत शिकारीस आला होता. त्याला रात्रीं अगदीं झोंप आली नव्हती; कारण त्याची मर्जी त्या ख्रिस्ती उपदेशकावर व त्या दोन मुलांच्या बापावर फार खप्पा झाली होती; आपल्या पत्नीच्या संबंधानें तर त्याचें मन फारच खिन्न झालें होतें ह्मणून त्याच्या मनांत जे दुःखकारक विचार आले होते ते दूर करावे या हेतूनें फटफटण्याच्या अगोदर तो उठून शिकारीस आला होता.

लिसांयिस तुरुंगांतून निसटला याविषयीं त्याला कांहींच माहीत नव्हतें. पहारेकऱ्याला तर माहीत होतें कीं, कैदी तुरुंगांतून पळाला पण त्याविषयीं जाहीर करण्याचें काम आपलें नाहीं म्हणून त्यानें लोखंडी दरवाजा बंद करून किल्ली आपल्या खिशांत घातली व आपली बंदूक खांद्यावर टाकून दरवाज्या-

पुढें जणूं काय कांहींच झालें नाहीं अशा रीतीनें पहारा करीत राहिला. तो शिपाई मनांत म्हणाला, 'जर कोणी मला पुसलें कीं, कैदी कोठें गेला? तर मी सांगेन कीं, मला माहीत नाहीं.' इतक्यांत शिकारी त्या गुहेच्या फारच जवळ येऊन ठेपले व कुत्र्यांनींहि एकाएकीं मोठ्यानें भोंकण्याचा सपाटा लावला. दोन मोठे शिकारी कुत्रे त्या गुहेंत शिरून मोठ्या आनंदानें भोंकत व आपल्या शेंपट्या हालवीत त्या मुलांच्या भोंवतीं फिरूं लागले. ते कुत्रे पाच्छाचे होते. त्यांस त्या दोन मुलांचा माग लागून तें त्यांस सांपडले म्हणून ते आपला आनंद दाखवूं लागले.

तिमथ्यस त्या कुत्र्यांस म्हणाला 'अरे विश्वासु प्राण्यांनो! तुम्ही आमची किती हानि करण्यास आलां आहांत, हें तुम्हांस माहीत नाहीं.' फिलेमोन गुहेच्या दारांतून डोकावून पाहून भीत भीत बोलणार तों पाच्छा स्वत: येऊन तेथें ठेपला. तो आपल्या घोड्यावरून उतरला व हातांत धनुष्य घेऊन आपल्याकडे येत आहे. तेव्हां 'हाय हाय! आपली काय दशा होईल?' असे विचार मनांत आणून दोन्हीं मुलें भयामुळें थरथरां कांपूं लागलीं. हें पाहून बाप म्हणाला, 'माझ्या प्रिय मुलांनो, भिऊं नका. ईश्वरी इच्छा ज्याप्रमाणें असेल त्याप्रमाणें होईल. हे परमेश्वरा तुझ्या इच्छेप्रमाणें होवो.' अशी प्रार्थना त्यानें केली. मुलांस गुहेच्या आंतल्या बाजूस हटवून स्वत: आपण त्यांच्यापुढें अशा रीतीनें उभा राहिला कीं, बाण सोडिला तर तो प्रथम त्यासच लागावा. पाच्छा गुहेच्या दाराजवळ आला व त्याला वाटलें कीं, येथें शिकार आपल्यास मिळेल; कारण, गुहेंत कांहीं हलल्यासारखें त्याला दिसलें व त्यावर बाण सोडणार इतक्यांत त्याला वाटलें कीं, तें कांहीं जनावर नव्हे, पण माणूस असावें; म्हणून आपलें धनुष्य खालीं ठेवून मोठ्या रागानें म्हणाला, 'जो कोणी असेल, त्यानें एकदम गुहेबाहेर यावें!' हें ऐकतांच लिसीयस पुढें येऊन अगदीं न भितां मुकाट्यानें त्याच्यापुढें येऊन उभा राहिला. पाच्छा म्हणाला, 'कांरे कैद्या तूं आहेस काय? तूं माझ्या हातून निसटणार काय? पण असें केल्यानें तुझा फायदा न होतां उलटा दोन दिवसांच्या आंत तुझा शिरच्छेद केला जाईल.' असें म्हणून पाच्छानें आपल्या लोकांस हाक मारून सांगितलें कीं, याला धरून बांधा,' नंतर आपल्या दोघां स्वारांस म्हणाला; 'तुम्ही तर याला आपल्या दोन घोड्यांच्यामध्यें धांवत मागें घेऊन जा व त्याच्या पायांत बेड्या घालून माझ्या तुरुंगांत जी सर्वांहून फारच मोठी व भयंकर अंधारकोठडी आहे तींत टाका.'

जेव्हां त्या दोन मुलांनीं आपल्या प्रिय बापाला बांधतांना पाहिलें तेव्हां ते दोघे पुढें येऊन आपल्या बापावर पाच्छानें दया करावी म्हणून त्याच्या हाता पायां पडूं लागले. हें पाहून, पाच्छा म्हणाला 'तुम्हीही येथें आलांत काय? हा माणूस किती दुष्ट असावा! त्यानें ह्या तरुण गुलामांस फितवून येथें आणिलें. यांच्यासाठीं माझ्या बायकोनें केवढी मोठी रकम देऊन यास विकत घेतलें!' जरी पाच्छा इतका रागावला होता तरी त्या सुंदर मुलांस हात पसरून रडतांना पाहून त्यास दया आली.

शेवटीं तो म्हणाला कीं, 'ह्या लेंकरांवर माझ्याच्यानें रागें भरवत नाहीं. तीं आपल्या बापाच्या मागें लागून आलीं म्हणून त्यांस शिक्षा करणें योग्य नाहीं. जें नीट तेंच त्यांनीं केलें. हा माणूस किती जरी वाईट असला तरी तो आपल्या मुलांचा बापच आहे. तर आतां दोन शिकाऱ्यांनीं एक एका मुलास घोड्यावर घेऊन परत त्यांस माझ्या हवेलींत न्यावें.' पाच्छाची तबेत अगदीं बिथरून गेली होती सबब तो सारा दिवस शिकारच करीत राहिला. त्या दोन मुलांस परत वाड्यांत आणिलें व त्याच्या गरीब बिचाऱ्या बापास अंधारकोठडींत टाकिलें.

---

## प्रकरण ११.

### परीक्षा.

त्या पाच्छाचें नांव अबदाल्ला होतें. त्याला शिकार गोड लागेना. एक हरिण अगदीं त्याच्या जवळून गेलें पण त्याची नजर त्याकडे गेली नाहीं. आपली बायको ज्या लोकांस शाप देऊन त्यांचा आपण अत्यंत तिटकारा करितों त्यांत जाऊन मिळाली, हा विचार त्याच्या मनांत घोळत होता. त्याला आपल्या बायकोचें धर्मांतर अगदीं सहन होईना. याकरितां तो तिच्यावर रागावला होता. तरी तिजवरची प्रीति त्याच्या मनांतून अगदीं नाहींशी झाली नव्हती. तिजवर पूर्वीप्रमाणें प्रीति करावी किंवा एकदम तिचा त्याग करावा याविषयीं तो फार विचारांत पडला होता. त्याचें मन समुद्राच्या पाण्यासारखें खळबळून गेलें होतें. सारा दिवस तो जंगलांत राहिला. त्याच्या बरोबरच्या माणसांस तो वेड्यासारखा दिसे. त्या दिवशीं रात्र होईपर्यंत तो शहरांत आला नाहीं. माघारा येतांना त्यानें आपल्या शिकाऱ्यांस अशी ताकीद दिली होती कीं, 'नगरांत जातांना शिकारीचें शिंग वाजवूं नये. तो गुपचिप शहरांत आला आणि जसा

तो दिवस त्याला दुःखाचा गेला त्याचप्रमाणें रात्रही दुःखाची गेली. दिवस उगवतांच अबदाल्ला तीन तुर्क उपदेशकांस बोलावून त्यांस म्हणाला, 'सर्व ईमाम लोकांत तुम्ही मोठे विद्वान, धार्मिक, आवेशी आणि वक्ते असें मी समजतों. ह्मणून मजकरितां एक मोठें महत्त्वाचें काम करण्याकरितां म्यां तुह्मांस बोलाविलें आहे. माझ्या बायकोकडे जाऊन तिची समजूत करून तिचें मन नवीन मत तिनें स्वीकारिलें आहे त्याच्यावरून उडवून तिला पुनः आपल्या धर्मीकडे वळवा. जर तुह्मी येवढें काम बजावाल तर मी तुह्मा प्रत्येकास मोहरांची एक एक थैली देईन; त्या इमामांनीं उत्तर दिलें कीं, 'आमच्यानें जितकी शिकस्त करवेल तितकी करूं. आमची खातरी आहे कीं, आम्हांस या कामांत यश येणार.' असें बोलून ते एलमान बाईकडे जावयास निघाले. पण दोन तासांच्या आंत तेथें त्यांचा हिरमोड झाल्यामुळें वांकडीं तोंडें करून ते परत पाच्छाकडे येऊन म्हणाले, ' सरकार, आमचा इलाज खुंटला. त्या बाईच्या मनांत भलतेंच वेड शिरलें आहे. तिला इतकें बोलण्याचें सामर्थ्य कोठून आलें हें आह्मांस अगदीं समजत नाहीं व तिच्या बोलण्याचें आमच्यानें खंडन करवत नाहीं, हें आह्मांस कबूल केलें पाहिजे.'

त्या दिवशीं पाच्छानें बहुत वेळां, ज्या दासी तिच्या तैनातींत होत्या त्यांतून प्रथम एकीस, व नंतर दुसरीस विचारलें कीं, 'तिच्या मनांत काय आहे?' मग त्यानें तिसऱ्या दासीस विचारलें कीं, 'तिचें डोकें उडविण्याचा जो माझा बेत त्याविषयीं ती काय म्हणते? ती मजवर फार संतापली आहे काय?' दासीनें उत्तर दिलें; 'सरकार, असें अगदीं नाहीं; बाईसाहेब उलट नित्याप्रमाणें तुह्मावर प्रीति करितात.' पाच्छानें आणखी एका दासीस विचारिलें, 'अजून तिचें मन पालटलें नाहीं काय?' तिनें उत्तर दिलें; 'त्यांचें मन कांहीं पालटल्यासारखें दिसत नाहीं. उलट तुमच्यासुद्धां मनाचा पालट व्हावा ह्मणून बाईसाहेब देवाची प्रार्थना करितात.' यावरून पाच्छाला थोडासा हर्ष वाटून तो म्हणाला 'तर मग म्यां तिला जिवें मारावें असें तिचें म्हणणें आहे काय?' दासी म्हणाली, 'याविषयीं एक शब्दही बाईसाहेब बोलल्या नाहींत. एवढाच त्यांचा हेतु आहे कीं, ज्या सुखाचा अनुभव त्यांस आला आहे तो अनुभव आपल्या प्रिय पतीसही यावा.

नंतर पाच्छा जेरिन नामक एलमान बाईची एक विश्वासू दासी होती तिला बोलावून म्हणाला, 'तुझा शब्द ती मोडीत नाहीं, कां तर तूं लहानपणापासून

तिच्याजवळ आहेस; म्हणून तुला तिचें मन हवें तसें वळवितां येईल. याकरितां तूं जाऊन तिचें मन वळवून तिजकडून ख्रिस्ती धर्मांचा त्याग करीव; आणि तिला पुन: आपल्या धर्मांत आण.' जेरिन ह्मणाली, 'मी नित्य त्यांचें मन वळविण्याचा यत्न करीत असतें व सांगतें कीं, अशा तरुण वयांत आपल्या जिवाची हानि कां करून घेतां.' बाईसाहेब ह्मणतात, 'ख्रिस्तावर विश्वास न ठेवण्यापेक्षां मला जिवाचा त्याग करणें बरें वाटतें.' पाच्छा म्हणाला, 'नुस्ती मी धमकी देतों असें तीस वाटतें काय? मी कांहीं तिला जिवें मारणार नाहीं.' जेरिन म्हणाली, 'आपण त्यांस मारून टाकाल याविषयीं त्यांच्या मनांत बिलकुल संशय नाहीं. तुम्ही तसें केल्यावांचून रहाणारच नाहीं. जर उमर सरदारानें तुमचा हात मागें हटविला नसता तर आपण मागेंच त्यांचें डोकें उडविलें असतें.'

पाच्छा म्हणाला, 'काय? ती मरणास भीत नाही?' जेरिन ह्मणाली, 'बाईसाहेब मरणास अगदीं भीत नाहींत. याचें कारण काय आहे तें मला समजत नाहीं. कायहो या बाईसाहेबांचें धारिष्ट! त्यांस मरणाचा आनंद वाटतो! एकदां रडत फुंदत मी त्यांस म्हटलें, बाईसाहेब हायहाय! या तुमच्या मानेवर तलवार फिरणार काय व हें तुमचें सुंदर डोकें तरवारीनें उडून रक्तांत लोळणार काय? असें होईल तेव्हां तें किती भयंकर दिसेल!' हें ऐकून, बाईसाहेब हसून, मला म्हणाल्या, 'हें सर्व क्षणिक होय. माझा आत्मा एकदम आकाशांत जाईल. वहावा! तेथलें गौरव व तेज यांकडेस माझे डोळे लागले आहेत. याविषयीं मी तुला किती सांगूं.' नंतर जेरिन पाच्छास म्हणाली, 'मी आपल्या आयुष्यांत बाईसाहेबांस इतकें सुखी कधीं पाहिलें नाहीं. हें एक मोठें आश्चर्यच होय. हे ख्रिस्ती लोक मोठे चमत्कारिक आहेत. यावरून मला असें वाटतें कीं, ह्यांचे धर्मांत कांहीं तरी विशेष असावें.'

पाच्छा म्हणाला, 'जेरिन तूंही ख्रिस्ती होण्याच्या लागास आली आहेस असें मला वाटतें.' असें ह्मणून कपाळास मोठी आठी घालून तिच्याकडेस मोठ्या रागानें पाहून तो तेथून चालता झाला.

सायंकाळीं, अबदाल्लाच्या मनांत आलें कीं, बागेंत फिरावयास जावें. जातांना हवेलीच्या पायऱ्यावर ओरमा या नांवाची एक दासी त्याला भेटली. ती पाच्छाच्या पत्नीच्या तैनातींत असून तिजकडे पाण्याचा लोटा घेऊन जात होती. तिचे डोळे रडून रडून सुजले असें पाहून पाच्छा तिला ह्मणाला, 'मुली

तूं फार रडत होतीस असें मला दिसतें. तुला एलमानाचा फार कळवळा येतो कीं काय?' दासी ह्मणाली, 'हें काय आपण विचारितां? बाईसाहेबांचा कळवळा येणार नाहीं असा कोण मनुष्य आहे? बाईसाहेब किती चांगल्या! जें त्यांना प्राप्त होणार तें किती भयंकर आहे!' पाच्छानें तिला विचारलें, 'तीही फार रडते काय?' दासी म्हणाली, 'फारसें नाहीं. आम्ही ज्या सर्व त्यांच्या तैनातींत आहोंत त्या बाईसाहेबांकरितां फार दुःख करितों. ह्मणून आमचा त्यांना कळवळा येऊन त्याही थोड्या रडतात. तरी त्या फार सुखी आहेत.'

पाच्छानें आणखी विचारलें, 'तर मग सारा दिवसभर ती काय करिते.' दासी म्हणाली, 'त्या नेहमीं वाचीत व प्रार्थना करीत असतात. कधीं कधीं मोठ्यानें तुह्मांकरितां व आह्मांकरितां प्रार्थना करितात.' पाच्छा म्हणाला, 'मला खरेंच सांग. तिच्या सर्व दासी व सोबतिणी, तिनें असा हट्ट धरूं नये म्हणून मनापासून यत्न करितात काय? ती जर हट्ट सोडीतच नसली तर तिला मेलेंच पाहिजे.' दासी म्हणाली 'आम्ही सर्व मनापासून यत्न करितों. पण त्या नेहमी ह्मणतात कीं, ज्यानें आपला प्राण मजसाठीं दिला त्याच्या नांवाकरितां मी खुषीनें मरण सोशीन. बाई साहेबांच्या सर्व दासी, मित्र व जे तिला भेटावयास येतात ते सर्व रडून पदर पसरून विनंति करितात कीं, बाईसाहेब, जसे आम्ही मुसलमान आहोंत तसें आपणही व्हावें. पण बाईसाहेब इतकेंच म्हणतात कीं, असें करण्यापेक्षां तरवारीनें माझे तुकडे तुकडे करावे हें बरें आहे.'

पाच्छा तिचा असा दुराग्रह पाहून फार संतापला, आणि म्हणाला; 'असा जर तिचा दृढनिश्चय आहे तर मग तिला पाहिजे तें तिनें करावें.' असें बोलून त्यानें आपल्या हवेलीजवळ वध करण्याची जागा तयार करण्याचा हुकूम लोकांस दिला. त्याप्रमाणें मशाली पेटवून त्यानी ती जागा रातोरात तयार केली.

---

## प्रकरण १२.

### दुसरें मोठें संकट.

दुसरे दिवशीं फटफटण्याच्या पूर्वी नगरांतील सर्व लोक गलबलून गेले. ख्रिस्ती गुलाम खेरीजकरून बहुतकरून नगरांतले सर्व लोक बोलूं लागले कीं, त्या ख्रिस्ती उपदेशकास शिरच्छेदाची शिक्षा योग्य आहे. सबब त्याचें मरण पहाण्यास त्यांना मोठा उल्हास वाटूं लागला. पुष्कळ लोकांस त्या दोन मुलांकरितां त्यांच्या बापाचा कळवळा येऊन ते म्हणाले कीं, पाच्छानें त्याला वांच-

बापयाचें होतें. तीं मुलें किती प्रेमळ आहेत. जेव्हां तीं नगरांत तुर्की पोषाख करून फिरतात तेव्हां त्यांना पाहून सर्वांस संतोष वाटतो. त्यांच्या सारखे त्याच्या वयाचे तरुण तुर्क तर सर्व नगरांत मिळणार नाहींत. ते गर्विष्ट नसून गरीबावर देखील प्रीति करितात. म्हणून, त्यांच्या बापास मारून त्यांस दुःखी करावें हें बरें नाहीं.'

पाच्छाच्या बायकोचेंही मरण जवळ येऊन ठेपलें. यावरून सर्व लोक तिजकरितांही शोक करूं लागले. ते म्हणूं लागले कीं, 'ही बाई रूपवती आहे इतकेंच नाहीं तर तिजसारखी सज्जन बाई या सगळ्या प्रांतांत मिळणार नाहीं. कितीवेळां पाच्छा संतापला असतां तिनें त्याला शांत केलें आहे! नगरांतील लोकांच्या कल्याणासाठीं पाच्छास अर्ज करून कितीवेळां त्यांचे उपयोगी पडली. नगरांतील भिकारीही तिजकरितां रडून म्हणूं लागले, 'इच्याप्रमाणें आम्हांवर कोणीही उपकार केले नसतील. ती जणूं आमची सख्खी आईच.' नगरांतील तुर्की स्त्रिया पाच्छाच्या नांवानें बोटें मोडून बोलूं लागल्या कीं, 'आपल्या बायकोस मारणें हें किती दुष्टतेचें व क्रूरपणाचें काम आहे. असें करण्यानें तो आमच्या नवऱ्यांस कसा वाईट कित्ता घालून देतो. आमचे नवरे आतां आम्हांशीं असेंच वर्तन करितील. आम्ही कबूल करितों कीं, त्या बाईनें खिस्ती धर्म स्वीकारला हें मोठें पाप केलें पण पहिल्याप्रमाणें तिला उत्तम बायकांप्रमाणें रहाण्यास कोणची हरकत आहे. खिस्ती लोकांत देखील पुष्कळ चांगलीं माणसें आहेत. आमच्या जवळ पुष्कळ खिस्ती गुलाम आहेत; ते तुर्क लोकांपेक्षां फार चांगले आहेत.'

गांवांतील इतर लोकांपेक्षां पाच्छा स्वतः फारच त्रासून तळमळूं लागला. ज्या दिवसाची आठवण सदोदित राहायाची तो उगवण्याच्या पूर्वीं त्यानें उमरास बोलावून त्याला म्हटलें, 'हे शूर मित्रा, तूं माझ्या हातास आड येऊन एक वेळ एलमानेचा जीव वांचविलास म्हणून तुजवर तिचा भरवसा फारच असावा, व तीहि तुझे उपकार मानीत असेल. सबब तुझें वजन तिजवर फार पडेल. याकरितां तिजकडे जाऊन तिला सांग कीं, जर तूं मुसलमान होशील तर मी अन्तोनियसास व त्या दोन मुलांच्या बापास जीवदान देतों. ह्या तिच्या मित्रांनीं मरावें असें तिला कधींही वाटणार नाहीं. म्हणून तिला असें सांग कीं, तुझ्या हातांत दोन माणसांचे प्राण आहेत. तर तूं त्याच्या मरणाचा दोष आपल्या माथ्यावर घेऊं नको.'

त्या सरदारानें एलमान बाईकडे जाऊन पाच्छाच्या आज्ञेप्रमाणें सर्व सांगितलें. एलमान बाई त्याचें सर्व ऐकून फारवेळपर्यंत विचार करीत बसली. शेवटीं म्हणाली; 'हाय हाय! मी किती काळजींत व संकटांत पडलें आहें!' असें म्हणून ती आपले हात आपटून म्हणाली, 'त्या दोन धार्मिक व सज्जन माणसांचा जीव वांचविण्याचें किती माझ्या मनांत आहे. तें परमेश्वरास माहीत आहे, तरी तसें करण्यास माझें धारिष्ट होत नाहीं. ज्या करारावर तसें करावें ह्मणून पाच्छा इच्छितो तो करार माझ्यानें करवत नाहीं. माझे दोन मित्र व ख्रिस्ती भाऊ अशा प्रकारें जीव वांचविण्यास कबूल होणार नाहींत. म्यां ख्रिस्ताचा त्याग केल्यास त्यांचें हृदय फुटून जाईल. याकरितां आम्हीं सर्वांनीं एका ठिकाणीं मरावें हें चांगलें आहे; कां तर मेल्यानंतर आम्हीं त्रिवर्ग मिळून लवकरच आकाशांत जाऊं.' तो तरुण गुलाम उमर एलमानबाईच्या कानापाशीं जाऊन हळूच म्हणाला, 'ज्याला आपण प्रभु म्हणतां त्या ख्रिस्ताचा प्रसिद्धपणें त्याग करून मी पुनः मुसलमान झालें एवढें बोला म्हणजे आपला व त्या दोघांचा जीव वांचेल. आपण मनांत ख्रिस्ती असलां तरी हरकत नाहीं.

एलमानबाईनें उत्तर दिलें, 'केवळ वाचेनें देखील माझ्यानें ख्रिस्ताचा त्याग करवत नाहीं; कारण खीस्त ह्मणतो जो कोणी माणसासमोर माझा त्याग करील त्याचा त्याग मी आपल्या आकाशांतील बापासमोर करीन. यास्तव वाचेनें व मनानें माझा विश्वास त्यावर आहे व तो तसाच पक्का ठेवीन. मी मरण्यास तयार आहें.'

हें ऐकून, उमर फार दुःखी होऊन, वांकडें तोंड करून वर सांगितलेलें उत्तर पाच्छापाशीं घेऊन आला. अबदाल्ला ह्मणाला, 'मी सर्व उपाय करून थकलों. आतां एक मात्र इलाज राहिला आहे. तो हा कीं, तिच्या देखतां तिच्या ख्रिस्ती मित्राचें डोकें उडवून तिला दाखवावें. त्याच्या डोक्यावर तरवार पडून जेव्हां रक्ताच्या धारा वाहतांना ती पाहील तेव्हां तिचे विचार बदलतील. कोमल मनाच्या स्त्रियांच्यानें तें पहावत नाहीं. तर हें पाहिलें ह्मणजे ती थरथरा कांपून बेशुद्ध पडेल व शुद्धीवर आल्यानंतर ती ह्मणेल कीं, माझी अशी अवस्था न होवो. मी आपल्या नवऱ्याची आज्ञा मान्य करून पुनः मुसलमानच होईन.' उमर म्हणाला 'ह्या चमत्कारिक बाईचा मनोनिग्रह इतका कठीण आहे कीं, ती असें कधीं ह्मणणार नाहीं.' अबदाल्ला ह्मणाला मी दुसरी एक युक्ति काढून पाहिली आहे ती ही कीं, त्या दोन मुलांच्या बापाचें डोकें

प्रथम उडवावें. ती जेव्हां हा रक्तपाताचा तमाशा पाहील तेव्हां त्या ख्रिस्ती उपदेशकास अशा भयंकर मरणापासून वांचवावें असें तिच्या मनांत येईल. कां कीं ती त्याचा फार मान राखिते व त्याच्याविषयीं तिला दयाही येते. असें केल्यानें आपल्याला यश आल्यावांचून राहणार नाहीं, याविषयीं माझी पक्की खातरी आहे. ज्या ठिकाणीं त्या कैद्याचा वध करावयाचा आहे त्यासमोर तिला न्यावें; तें पाहिल्यावर जर तिचें मन वळणार नाहीं, तर जो ठराव मी केला आहे, त्याप्रमाणें मी करणार.' अशा गर्वाच्या घमेंडींत जरी तो होता तरी मनांत फार दु:खी असून तळमळत होता.

---

## प्रकरण १३.

### लिसीयसास वधस्थलीं नेतात.

पाच्छाच्या हवेलींत जिकडे तिकडे गुपचूप असून लोक फार दु:खित होते. पाच्छाला तर अगदींच चैन पडेना. तो मोठ्या काळजींत पडला. एलमानबाई स्वस्थपणें आनंदानें आपल्या मरणाची वाट पाहत होती. वधस्थलीं लोकांच्या मोठ्या समुदायांनीं तुर्की शिपायांस वेरा घातला होता. बाजारच्या आसपास जीं घरें होतीं त्यांच्या सर्व खिडक्या माणसांनीं गच्च भरून, पुष्कळ लोक कौलांवर व गच्च्यांवर जाऊन बसले होते. पाच्छाच्या खुद्द पत्नीचा वध होणार हें, जें पूर्वीं कधीं ऐकण्यांतही आलें नव्हतें तें पाहण्याची इच्छा सर्वांच्या मनांत उत्पन्न झाली.

एलमानबाई आपल्या दोन दासींसह वधस्थलाचा चबुत्रा पाच्छाच्या वाड्याच्या देवडीहून उंच केला होता त्यावर येऊन पोहोंचली. तेव्हां जमलेल्या लोकांच्या मनांत दया येऊन ते कुजबुजूं लागले. पुष्कळ लोक फुंदून बोटानें दाखवूं ह्मणूं लागले 'ती पाहा तेथें!' कित्येक रडून म्हणूं लागले, 'असा कोण पाषाणहृदयी आहे कीं, ज्याच्या मनांत या सज्जन बाईस पाहून दया येणार नाहीं.' त्या मेळ्यांत जे ख्रिस्ती गुलाम होते ते परमेश्वराची प्रार्थना करूं लागले कीं, 'हे परमेश्वरा, या बाईवर दया कर; हे प्रभु येशू तूं हिचे बरोबर ऐस!' सर्व लोकांचे डोळे तिजकडे लागले होते. एलमानबाईचा पेहराव अगदीं शुभ्र होता. तिच्या अंगावर दागिने अगदींच नसून तोंडावर जाळीचा जो बुरखा तो तिनें मागें सारिला होता. जरी तिचा चेहरा जरासा फिका दिसत

होता, तरी ती शांत असून तिच्याठायीं भयाचा लेश देखील नव्हता. तिनें आपले डोळे वर आकाशाकडे करून हात जोडून आपल्या मनांत प्रार्थना केली. सर्व लोकांस तिच्याकडे पाहून मोठा गहिंवर आला.

पाच्छा आपल्याबरोबर पुष्कळ दरबारी लोक व चाकरमाने घेऊन वाड्याच्या दरवाजांतून वधस्थलाच्या चबुऱ्याजवळ आपल्या हुद्याचा जांभळी रंगाचा पोषाक करून आला होता. त्यानें आपली तरवार कंबरेस बांधली होती. तिचें म्यान व मूठ सोन्याची असून ती हिऱ्यानें चमकत होती. डोक्यास पांढरा फेटा बांधला होता. त्याचा चेहरा काळसर व दुःखित दिसत होता. त्याचे ठळक डोळे व काळ्या भिंवया आणि लांब दाढी असल्यानें तो मोठा डौलदार पुरुष दिसत असे. यापूर्वी तो नगरांत ज्या ज्या वेळीं बाहेर निघे त्या त्या वेळीं लोक मोठ्या जयजयकारानें त्याला मुजरा करीत. पण या वेळीं त्याला कोणी सलामसुद्धां केला नाहीं.

लिसीयसास त्याच्या मोठ्या पहाऱ्यासहवर्तमान त्या ठिकाणीं आणिलें. तेव्हां तो मोठ्या निग्रहानें त्या चबुऱ्याच्या पायऱ्या चढला. नाझरानें त्याच्या बेड्या तोडून त्याची मान खुली करण्याकरितां त्याचा गळेबंद सोडिला. शिरच्छेद करणारा आपली तरवार उपसून तयार झाला. लिसीयस डोळे वर करून ईश्वराची प्रार्थना करूं लागला. जरी पाच्छा दरबारी पोषाक करून तेथें आपल्या लोकांसह मोठ्या थाटानें बसला होता तरी त्याच्यापेक्षां लिसीयस यावेळीं अधिक तेजःपुंज दिसूं लागला. हा दुःखसमय मोठा कठीण असल्या कारणानें जे निर्दय होते त्यांशिवाय सर्वांचें मन दुःखानें गजबजून गेलें. लिसीयसानें शिरच्छेद करणाऱ्याच्या हुकुमावरून गुडघे टेंकिले व शिरच्छेद करणारा तरवार उचलून शिरस्त्याप्रमाणें शेवटल्या हुकुमाकरितां पाच्छाकडेस पाहूं लागला.

इतक्यांत त्याचीं दोन मुलें चबुऱ्यावर येऊन मोठ्यानें रडूं लागलीं. 'बाबा!' बाबा असें म्हणत उभयतां त्याच्या मानेवर पडून म्हणालीं, 'बाबा तूं आम्हांस सोडून जाणार काय? तूं खचितच मरणार काय?' हें ऐकून लिसीयस पुनः उभा राहिला व त्यानें प्रत्येकास आपल्या हातावर घेऊन पोटाशीं धरून चुंबनें घेतलीं व मोठ्यानें म्हणाला, 'माझ्या अतिप्रिय लेंकरांनो, धीर धरा. मी मरत नाहीं. मी नेहमी जिवंत राहीन. मी देवाजवळ जात आहें. अहाहा! आतां मी आपल्या दैवी तारकाचें मुख पाहीन, व तो माझ्या दृष्टीस पडेल.

यामुळें मला अत्यंत हर्ष होतो! तुमच्या प्रिय आईस भेटून आकाशांत तिला तुमचा सलाम सांगेन. ईश्वर जो अनाथांचा नाथ तो तुम्हांस आईबापांच्या ठिकाणीं होवो. मी आतां तुम्हांस ईश्वराच्या स्वाधीन करितों. तुह्मी खरे ख्रिस्ती रहा, म्हणजे तुमचें कल्याण होईल. आपण आकाशांत पुनः भेटूं. हीच आतां आपली शेवटली भेट!'

मुलें थोडा वेळ एकमेकाच्या कानीं लागून नंतर मोठ्यानें ओरडून म्हणालीं, 'चला आपण पाच्छाकडे जाऊं. त्याला कांहीं सांगावयाचें आहे.' असें ह्मणून चबुऱ्याच्या पायऱ्या घाईनें उतरलीं. लोकांनीं त्यांस वाट दिली. ज्या चबुऱ्यावर पाच्छा बसला होता त्या ठिकाणीं जाऊन तीं त्याच्या पायां पडलीं. पाच्छा रागानें ह्मणाला, 'तुम्हीं काय मागतां? मी तुमच्या बापास क्षमा करणार नाहीं. त्याचा जीव वांचविण्यासाठीं माझें आर्जव करून कांहीं फल नाहीं.' मुलें म्हणालीं 'त्याचा जीव वांचवावा ह्मणून आम्ही अर्ज करितों असें कांहीं नाहीं. आह्मी समजतों कीं, आमचा अर्ज मान्य होणार नाहीं. आमचें येवढेंच आपल्यापाशीं मागणें आहे कीं, आह्मांसही आमच्या बापाबरोबर मारण्याचा हुकूम व्हावा.

पाच्छा विस्मय करून ह्मणाला 'तुह्मीं कां व कोणत्या रीतीनें मरावयाची इच्छा करितां? म्या तुमचीं डोकीं उडवावीं असें तुह्मी मागतां काय? असें केल्यानें तुह्मांस सुख प्राप्त होईल काय? मुलें ह्मणालीं, 'होय. अशीच आमची अंतःकरणापासून इच्छा आहे.' 'ही इच्छा तुह्मास कशी उत्पन्न झाली? व असा अर्ज करण्याचें प्रयोजन काय?' असें पाच्छानें पुनः त्यास विचारिलें. मुलें ह्मणालीं, 'आह्मीं आपल्या बापाबरोबर आकाशांत जाण्यास इच्छितों.' पाच्छा टक लावून त्यांकडेस पाहात बसला. तीं मुलें अगदीं रडलीं नाहींत आणि त्यांचीं तोंडें आसवांनीं जरी ओलीं झालीं होतीं तरी तीं आनंदित व सुखी दिसूं लागलीं. पुनः तीं ह्मणूं लागलीं कीं, सरकारांनीं आमचा अर्ज मान्य करावा. पाच्छा धैर्यवान् पुरुषांचा जाणता होता ह्मणून त्याच्यानें या दोन मुलांचें धैर्य पाहून मोठें आश्चर्य केल्यावांचून राहवेना. कोणास वाटलें नव्हतें कीं ते असा अर्ज करितील, आणि इतक्या आनंदानें मरण्यास राजी होतील. हा मोठा चमत्कार आहे असें त्यास वाटल्यावरून तो चकित होऊन आपण कोठें आहों व काय करितों याविषयीं त्याला सुचेनासें झालें. ह्मणून, त्यानें शिरच्छेद करणाऱ्यांस हाक मारून सांगितलें

कीं, 'आपली तरवार म्यानांत घाल. कारण आज शिरच्छेद करावयाचा नाहीं. कैद्यास पुनरपि अंधारकोठडींत न्या.'

हा बेत रहित झाल्यावरून कित्येक कुरकुर करूं लागले; कित्येकांस त्या दोन मुलांच्या बापास व पाच्छाच्या पत्नीस क्षमा मिळण्याची चांगली संधि सांपडली ह्मणून आनंद झाला. असा प्रकार झाल्यामुळें बहुतकरून सर्वच लोक 'पाच्छा चिरायु होवो!' असें ह्मणून जयजयकार करूं लागले.

लोकांची फुटाफूट होऊन पुष्कळ स्त्रियांचे व पुरुषांचे थवे जागोजाग उभे राहून म्हणूं लागले, 'त्या मुलांनीं पाच्छापाशीं काय सांगितलें तें समजेल तर बरें होईल. कारण आम्ही फार दूर उभें होतों.' कित्येक ह्मणाले, 'दूर असल्यामुळें आम्हांस कांहीं ऐकूं आलें नाहीं. तीं जें कांहीं बोललीं तें पाच्छास व जे त्याचे सरदार त्याच्याजवळ बसले होते त्यांसच माहीत असेल. तें कांहीं तरी चमत्कारिक असावें, कां पाच्छा विस्मित झाला, यावरून सहज अनुमान होतें. त्याचा चेहरा एकदम पालटून त्यानें शिरच्छेद तहकूब केला! हा लहानसा चमत्कारच समजावा.'

लिसीयसास हें मोठेंच अद्भुत वाटलें. त्याचीं मुलें पाच्छाजवळ काय बोललीं याविषयीं त्याला कांहीं ठाऊक नव्हतें. त्याला इतकें मात्र माहीत होतें कीं, त्याचा जीव वांचविण्यासाठीं कोणी अर्जी केली असती तर ती चालली नसती. तेव्हां जें कांहीं घडून आलें तें केवळ ईश्वरीसूत्रानें झालें, अशी त्याची खात्री झाली.

पाच्छाची बायको ईश्वराचे उपकार मानीत आपल्या खोलींत गेली. लिसीयसास परत तुरुंगांत आणिलें. त्याचीं दोन मुलेंही त्याबरोबर गेलीं. कांतर त्यांची इच्छा आपल्या बापापाशीं राहावयाची होती. तीं म्हणालीं कीं, ती जागा कितीही भयंकर असली तरी चिंता नाहीं; आम्हीं आपल्या बापाबरोबर राहूं. त्याच्या जवळ असल्यानें आम्हांस इतकें सुख होईल कीं, जणूं आह्मी आकाशांतच आहों. पण त्यांस अंधारकोठडींत जाण्याची परवानगी मिळेना ह्मणून बाप लेंक एकमेकांस आलिंगन देऊन गुडघे टेकून देवाची व तारकाची आपलें संरक्षण झाल्याबद्दल उपकार मानून स्तुति करूं लागले.

---

# प्रकरण १४.

## जुवळी भावंडें पाच्छापुढें येतात.

अबदाल्ला पाच्छा आपल्या स्वारीचीं माणसें सोडून बागेंत फिरावयास गेला. तेथें तो खजुराच्या वृक्षांच्या रांगींत टेहळत इकडेतिकडे फिरत होता. इतक्यांत, उभा राहून आपल्याशींच बोलूं लागला कीं ‘हीं मुलें इतकीं लहान असून त्यांना एवढें धैर्य आहे, हें माझ्या लक्षांत आलें नाहीं ही मोठी नवलाची गोष्ट होय. मला असें वाटत असे कीं, मी मोठ्या शौर्यानें लढाईस जातों. पण जर मला लाचार अपराध्यासारखें दुःखानें व फजितीनें मरावें लागलें आणि तशांत स्वतःचें रक्षण करण्याकरितां माझे हातांत तरवार नसली तर माझें धैर्य खचून मी खचित भिऊन मूर्छित पडेन. जर सुलतानानें रेशमाची *नाडी मला पाठविली असती तर मी अगदीं घाबरून गेलों असतों, हें मला कबूल केलें पाहिजे. तर मग इतर माणसांच्या ठायीं दिसून येत नाहीं असलें अद्भुत धैर्य या मुलांस कोठून आलें बरें ? आह्मा तुर्क लोकांस असें वाटतें कीं, ख्रिस्ती मत केवळ मूर्खपण आहे, पण तसें दिसत नाहीं. म्हणून मला बारीक दृष्टीनें या मताची परीक्षा केली पाहिजे.’

थोडावेळ टेहळणी केल्यावर पुनः पाच्छा स्वस्थ उभा राहून आपल्या मनांत बोलूं लागला कीं,— बरें झालें कां तीं मुलें त्यावेळीं मजकडे आलीं; नाहींतर मला माझ्या बायकोचा जो राग आला होता त्यावरून माझ्या हातून मोठाच अनर्थ घडला असता. तिला मारण्याचा माझा निश्चय म्या पुष्कळ लोकांसमक्ष प्रसिद्धपणें विदित केला होता. म्हणून माझ्या अब्रूस बट्टा लाविल्यावांचून तो मला फिरवितां आला नसता. अशा प्रसंगीं त्या दोन मुलांनीं अवचित येऊन मला संकटांतून निघण्यास सवड करून दिली हें खचित आहे.’ पुनः तो म्हणाला, कीं ‘जर कोणी कांहीं अयोग्य केलें किंवा कांहीं अयोग्य करण्याचें कोणाच्या मनांत आलें व नंतर विचारांतीं आपण केलें तें बरोबर नाहीं किंवा असें करणें अयोग्य होय असे उद्गार त्यानें प्रदर्शित केले तर त्यांत त्याच्या अब्रूस बट्टा लागला असें आमच्या कित्येक पाच्छांचें मत आहे पण तें रास्त नाहीं, व विचारी लोकांस कबूलही नाहीं. म्हणून म्या जो पूर्वीं निश्चय केला

* अशी नाडी सुलतानाकडून आली म्हणजे फांस घालून मारण्याचा हुकूम आला असें समजावें.

होता तो या मुलांच्या धैर्यावरून रद्द करण्यास कांहीं हरकत नाहीं. तो रद्द केला ह्मणून मला कोणी दोष देणार नाहींत इतकेंच नव्हे तर उलट सर्व लोक माझी वाहवा करितील. याप्रकारची लोकांची वर्तणूक अनेक वेळ माझ्या अनुभवास आली आहे. शिक्षेचा निश्चय अमलांत आणणार म्हणून जेव्हां लोकांनीं ऐकिलें तेव्हां ते फार दुःखी झाले व शिक्षा करणें जरा लांबणीवर टाकलें तेव्हां त्यांस मोठा आनंद होऊन ते माझी वहावा करूं लागले, हें मी प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांनीं पाहिलें. मी कायद्याप्रमाणें कांहीं न करितां दयेच्या अनुरोधानें माझें चालणें त्यांस पसंत पडलें असें दिसतें. असे विचार मनांत आल्यामुळें पाच्छा अंमळ शांत होऊन आपल्या खोलींत गेला व जे गुलाम तेथें हजर होते त्यांस त्या दोन मुलांस आपणाकडेस पाठवून देण्यास हुकूम केला. तीं मुलें तेथें येऊन कांपतकांपत दूर उभीं राहिलीं. पाच्छा ह्मणाला, 'माझ्या बाळांनो, जवळ या. तुह्मांस पाहून मला फार सुख होतें. तुमचें धैर्य पाहून मी थक्क झालों. या, माझे जवळ बसा. फिलेमोना, तूं माझ्या उजवीकडे बस. तिमथ्यसा तूं डावीकडे बैस. माझ्या मुलांनों, आतां जें मी तुम्हांस विचारीन त्याचीं मला नीट उत्तरें द्या.'

त्यानें त्यांस त्यांच्या बापाविषयीं व त्यांच्या मेलेल्या आईविषयीं पुष्कळ गोष्टी विचारल्या. नंतर ते त्यांचा बाप आणि अन्तोनियस हे तुर्कस्थानांत कसे आले, एलमानबाईनें त्यांस आपल्या हवेलींत जागा कशी दिली व आपल्या अपरोक्ष एलमानेनें काय काय केलें; हें सर्व त्यानें त्यांस सविस्तर विचारिलें. मुलांनीं निष्कपटानें आपल्या अल्पमतीनें त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. त्यांच्या बोलण्यावरून केव्हां केव्हां पाच्छास हसूं येई. शेवटीं पाच्छा म्हणाला, 'हें सर्व ऐकून मला संतोष झाला. तुमचा बाप वास्तविक भला मनुष्य आहे. तुमची आईही फार उत्तम बाई होती. आणि अंतोनियसाची सुद्धां मला स्तुति केली पाहिजे. पण मला सांगा तुमच्या बापानें आमच्या पैगंबराची कधीं कांहीं निंदा केली काय?' मुलें ह्मणालीं, 'आमच्या बापानें तुमच्या पैगंबराचें नांव देखील काढलें नाहीं. ह्या देशीं पहिल्यानेंच आम्ही त्याचें नांव ऐकिलें.' पाच्छा ह्मणाला, 'तुह्मी खिस्ती लोक आह्मा तुर्क लोकांचा द्वेष करितां ना? दोघेही मोठ्यानें ओरडून ह्मणाले, 'साहेब, असें अगदीं नाहीं बरें. ज्या सर्व लोकांवर ईश्वर आपल्या सूर्याचा प्रकाश पाडितो त्या सर्वांवर आह्मी प्रीति करावी. तुर्क लोकांवर सूर्याचा प्रकाश पडतो हें आह्मी आपल्या डोळ्यांनीं पाहा-

६

तों म्हणून तुर्क लोकांवर प्रीति करावी हें आमचें कर्तव्य होय.' पाच्छा जरासा हसून म्हणाला 'तुर्की लोकांच्या सर्व गोष्टी तुह्मास आवडत नाहींत काय?' मुलांनीं उत्तर दिलें, 'सर्व गोष्टी आह्मांस आवडतात असें नाहीं.' पाच्छा ह्मणाला, 'कोणती गोष्ट तुम्हाला आवडत नाहीं.' मुलें म्हणालीं, 'तुर्क लोक ख्रिस्ती लोकांस लुटून त्यांस गुलाम करितात, हें आम्हांस आवडत नाहीं. असें केल्यानें आमच्यां पैकीं पुष्कळांस फार दुःख सोसावें लागतें. ख्रिस्ती लोकांनीं लढाया करून पुष्कळ तुर्क लोकांस पाडाव करून नेलें; पण त्यांस गुलामासारिखें वागविलें नाहीं. ख्रिस्ती लोकांनीं तुर्क लोकांस चोरून नेऊन त्यांस गुलाम कधीं केलें नाहीं.'

पाच्छा म्हणाला, 'तुर्क लोक असें करितात म्हणून तुमच्या बापानें तुर्क लोकांस कांहीं दोष दिला काय?'

तिमथ्यस म्हणाला, 'नाहीं हें सर्व आम्हीं स्वतः पाहिलें आहे. हें कांहीं आम्ही बापाच्या तोंडचें ऐकिलेलें नाहीं. आमच्या घरीं व आमचे देशीं तुर्क गुलाम नाहींत. पण तुमच्या देशांत पुष्कळ ख्रिस्ती गुलाम आहेत.'

फिलेमान म्हणाला, 'आमच्या बापाला इतकेंच दुःख वाटतें कीं, तुर्कस्थानांत फारसा इनसाफ नाहीं, व त्यामुळें बहुत निरापराधी लोकांस शिक्षा होतात. रेशमाची नाडी कधीं कधीं सुलतान पाच्छा लोकांस पाठवितो ती विषयीं बापानें आह्मांस एकदां सांगितलें खरें पण त्याचा अर्थ काय आहे, हें कांहीं आमच्या ध्यानांत आलें नाहीं. ती नाडी जरी रेशमाची असली तरी ती फार वाईट असावी असें आमच्या बापानें ती विषयीं जें सांगितलें त्यावरून आम्हांस वाटतें.'

पाच्छा जरासें तोंड वांकडें करून म्हणाला तुमच्या बापाचें हें ह्मणणें अगदीं रास्त आहे. पण तुर्क लोकांविषयीं आणखी तुमचा बाप काय म्हणतो?'

तिमथ्यस ह्मणाला, 'तुर्क लोक डाग देऊन तरवारीनें डोकें उडवून आपल्या धर्माचा लोकांनीं स्वीकार करावा ह्मणून गुलामांवर पुष्कळ जुलूम करितात,' असेंही तो ह्मणत असतो.

पाच्छा म्ह० 'त्या विषयीं आतां पुरे.' ह्यावरून त्याच्या अंतःकरणास चिमटा बसला; कारण त्याच्या बायकोनें पुनः मुसलमान व्हावें ह्मणून तिला त्यानें तरवारीचें भय दाखविलें होतें. नंतर पाच्छा ह्मणाला; 'आपण दुसऱ्या गोष्टी बोलूं या. तुमच्या धर्मा विषयीं आणखी कांहीं ऐकावें असें माझ्या मनांत आहे.'

त्यानें मुलांस पुष्कळ प्रश्न केले. त्यांच्या उत्तरांवरून तो फार खुष झाला. केव्हां केव्हां त्यानें आपली मान डोलविली पण कांहीं बोलला नाहीं. पण जा वाक्यें त्या मुलांनीं पवित्र शास्त्रांतून ह्मणून दाखविलीं तीं पाच्छास फार आवडलीं. त्यांच्या धार्मिक आईबापांनीं व अन्तोनियसानें तीं वारंवार मोठ्यानें बोलून दाखविल्यामुळें त्यांस तोंडपाठ झालीं होतीं तीं हीं:—

'देव प्रीति आहे, आणि जो प्रीतींत राहतो तो देवामध्यें व देव त्यामध्यें राहतो.' योहान्न. प. पत्र अ. ४. १६

देवानें जगावर एवढी प्रीति केली कीं, त्यानें आपला एकुलता पुत्र दिल्हा, यासाठीं कीं जो कोणी त्यावर विश्वास ठेवितो त्याचा नाश होऊं नये, तर त्याला सर्वकाळचें जीवन व्हावें.' योहान्न अ. ३. १६

'जितक्यांनीं त्याच्यावर विश्वास ठेवला, तितक्यांस त्यानें देवाचीं लेंकरें होण्याचा अधिकार दिला.' योहान्न अ. १. १२

'कां तर हीच देवावरची प्रीति आहे कीं, आह्मी त्याच्या आज्ञा पाळाव्या आणि त्याच्या आज्ञा भारी नाहींत.' योहान्न. प. प. अ. ५. ३

'तुझा देव परमेश्वर यावर तूं आपल्या सर्व अंतःकरणानें व आपल्या सर्व जिवानें व आपल्या सर्व मनानें प्रीति कर,'— 'हीच पहिली व मोठी आज्ञा आहे.'—'आणि दुसरी ती इज सारिखी आहे कीं, तूं जसी आपणावर तसी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर.'—'या दोन आज्ञांत सर्व नेमशास्त्र व भविष्यशास्त्र आटलीं आहेत.' मात्थी अ. २२. ३७, ३८, ३९, ४०

'आणि जसें माणसांनीं तुम्हांशीं वर्त्तावें म्हणून तुमची इच्छा आहे तसेंच तुम्हीही त्यांसीं वर्त्ता.' लूक अ. ६. ३१

'जर तुला जीवनांत जायाचें असलें तर आज्ञा पाळ.' मात्थी अ. १९. १७

'जग व त्याची हाव होऊन जाती, परंतु जो देवाच्या इच्छेप्रमाणें करितो तो सर्वकाळ राहतो.' योहान्नाचें प. प. अ. २. १७

'जो माझें वचन ऐकतो त्याला सर्व काळचें जीवन आहे आणि तो मरणांतून जीवनांत पार गेला आहे.' योहान्न अ. ५. २४

'न्यायी आपल्या बापाच्या राज्यांत सूर्यासारिखे प्रकाशतील.'

मात्थी अ. १३. ४३

हीं ईश्वरीवचनें त्या दोन मुलांच्या तोंडून ऐकण्याचा अबदल्लास जरी हा

पहिलाच प्रसंग होता तरी तीं त्याच्या अंतःकरणांत फार ठसलीं; व त्यामुळें मुलांस तीं पुनःपुनः ह्मणून दाखवावीं लागलीं.

नंतर पाच्छा ह्मणाला, 'बरें तर तुम्ही सुंदर, शूर आणि सुशिक्षित अशीं मुलें आहांत; तेव्हां आतां जाऊन आपल्या बापाला सांगा कीं, तुझी सुटका झाली. आजपासून तुझें माझ्या हातून जितकें कल्याण होईल तितकें करीन.'

---

## प्रकरण १५.

## आनंदाची बातमी.

पाच्छा तेथून उठून, 'उमर' समोरच्या खोलींत लिहीत बसला होता, त्याच्याजवळ जाऊन म्हणाला कीं 'या दोन्ही मुलांस घेऊन त्यांच्या बापाकडे जा, व त्याच्या बेडया काढून त्याला इकडे घेऊन ये.' मुलें उमराबरोबर गेलीं; अंधारकोठडीच्या आंत खालीं उतरतांना तीं मुलें थरथरां कांपूं लागलीं. लोखंडी दार उघडून ते त्या कोठडीच्या आंत पाहूं लागले तों थोडासा उजेड त्या दारांतून पडला होता तो त्यांस दिसूं लागला. त्यांच्या प्रिय बापाच्या पायांत जड बेडया असून एका दगडाला त्या बांधल्या होत्या, व त्या दगडावर तो बसला होता. त्याची अशी वाईट अवस्था पाहून मुलांचे नेत्रांस अश्रु आले, पण लवकरच त्यांचें दुःख निवारण होऊन ते आनंद करूं लागले. दोघांनीं लवकर जाऊन त्याला आलिंगन देऊन मोठ्या आनंदानें सांगितलें कीं, 'बाबा, तुझी सुटका झाली. पाच्छा तुझें कांहीं वाईट करणार नाहीं पण, चांगलेंच करील ह्याविषयीं तो तुला स्वतः सांगेल. आम्ही तुला त्याच्याकडे नेण्याकरितां आलों आहों.'

बाप ह्म०—'माझ्या प्रिय मुलांनो, ज्या सुखाची व आनंदाची आपल्याला आशा नव्हती तें देवानें आपल्यासाठीं तयार केलें हें मोठें नवल आहे! खचित, हे परमेश्वरा, तूं राजांचीं व प्रधानांचीं मनें पाण्याच्या झऱ्याप्रमाणें वळवितोस. तूंच ही उलटापालट केली आहेस. अहाहा! मी किती तुझा आभारी आहें! हे परमेश्वर, तूं किती उत्तम आहेस.'

तिमथ्यस म्ह०—'होय, खचितच आपला देव चांगला आहे. आपण गुहेंत असतांना आमचें संरक्षण करून आह्मांस आमच्या शत्रूंच्या हातीं पडूं देऊं नये ह्मणून आपण देवाची प्रार्थना केली, त्याची तुला आठवण असेलच.

त्यावेळीं आपल्यास वाटलें कीं, देव आपली प्रार्थना ऐकत नाहीं, पण आतां त्यानें आपली विनंती अशा चमत्कारिक रीतीनें मान्य केली कीं, असें होईल याविषयींची कल्पनासुद्धां त्यावेळीं मनांत आली नाहीं.'

फिलेमोन म्ह०– 'आपण त्या गुहेंत असतां किती आग्रहानें बरें मनापासून देवाची विनवणी केली कीं, त्यानें आमच्या बापास तरी वांचवावें. असें असतां आपल्या बापास बांधून दोन स्वारांच्यामध्यें पाच्छानें त्याला धांवण्यास लाविलें. त्यावेळीं मी फार दुःखी होतों. ईश्वरानें आपली प्रार्थना कां ऐकली नाहीं याविषयीं त्यावेळीं कांहींच लक्षांत आलें नाहीं व तेव्हां मला असें वाटलें कीं, ईश्वर आपली कांहीं काळजी करीत नाहीं. पण आपण जी प्रार्थना केली ती व्यर्थ झाली नाहीं. आपल्याला आशा होती त्यापेक्षां आपलें कल्याण अधिक कसें करावें हें ईश्वरास माहीत आहे. आपण जें मागतों त्याची धीर धरून वाटमात्र पहावी.'

बेडया काढून टाकल्यावर त्यांचा बाप तुरुंगांतून बाहेर आला. उमर त्यांच्या बरोबर होता. लिसीयस दोन्ही मुलांस हातानें धरून पाच्छाच्या दिवाणखान्यांत आला. पाच्छा त्याला पाहतांच उठून भेटावयास सामोरा आला. त्याचा हात धरून त्याला गादीच्या अगदीं जवळ बसवून ह्मणाला, 'आपण आतां मित्र आहांत. म्या तुमचा अपराध केला आहे. अशा गुणी लेंकरांचा बाप अगदीं वाईट नसावा. या माझ्याजवळ बसा.' त्याचा हात धरून त्याला आपल्या गादीजवळ बसविलें ह्मणून त्याला तेथें बसणें भाग पडलें. तो बसल्यावर दोन्ही मुलांनीं हात जोडून पुढें येऊन पाच्छापुढें उभें राहून मोठ्या विनयानें आपल्या प्रिय शिक्षकास बंदींतून मुक्त करण्यास पाच्छास अर्ज केला. मुलें ह्मणालीं 'सरकार, तो माळ्याचें काम फार चांगलें जाणतो. त्यास सोडून देण्याची मेहरबानी आपण करावी.' पाच्छा मुलांस ह्मणाला, 'मुलानों त्याची आठवण मला तुम्हीं केलीत, हें फार चांगलें काम केलेंत. तुह्मी वास्तविक सद्गुणी लेंकरें आहांत. तर आतांच जा आणि त्याला सांगा कीं, जसा तुमचा बाप माझा मित्र झाला आहे, तसा तोही माझा मित्र आहे. त्याला इकडे आणा. उमर पुनः तुमच्या बरोबर येईल.'

दोन्ही मुलांनीं उमराच्या हातांत हात घालून उडया मारीत उमरास ओढीत नेलें. याविषयीं अन्तोनियसाला तर कांहींच माहित नव्हतें. चाहुलीवरून कोणी आपल्या कोठडीकडे येत आहे असें त्याला वाटलें. जेव्हां

दरवाजाची थोरली कडी उघडून दरवाजे खुले झाले तेव्हां त्यास अशी शंका आली कीं, आपल्याला मारायास नेण्यासाठीं कोणी येत आहे. दरवाजे उघडतांच मुलांनीं मोठ्या हर्षानें आंत जाऊन उड्या मारून म्हटलें; "गुरुजी, आनंद करा! आपला शिरच्छेद आतां होणें नाहीं!! आपली सुटका झाली!!! आतां पाच्छा आपणावर रागें भरणार नाहीं. आपणाला त्याच्याकडे न्यावयास आलों आहों. आमचा बाप हल्लीं त्याजपाशीं बसला आहे. पाच्छाची आतां आपणावर मर्जी खूष झाली आहे. आतांच आमच्या बरोबर चला."

अन्तोनियसास मोठें नवल वाटलें व तो म्ह०—'हें खरें काय? जर असें झालें असलें तर परमेश्वराकडूनच हें घडलें आहे! कोणाही माणसाच्या हातून हें झालें नसतें. हे कृपासागरा परमेश्वर, त्वां आमची प्रार्थना ऐकिली खरी.'

अन्तोनियसानें आपल्या अंधारकोठडींत असतां मोठ्या प्रेमानें अशी प्रार्थना केली होती कीं, 'ईश्वरा त्या मुलांच्या बापाचें संरक्षण कर त्या सज्जन बाईचाही वध होऊं देऊं नको. पाच्छाच्या हातास त्याच्या धार्मिक पत्नीच्या वधाच्या दोषाचा डाग न लागो.' आणखी त्यानें प्रार्थनेंत असें म्हटलें होतें कीं, 'मजविषयीं चिंता नाहीं. पण हे करुणाकरा, तूं दयासिंधु आहेस म्हणून त्या सज्जन मुलांच्या सज्जन बापाचें व त्या परोपकारी मावलीचें संरक्षण कर. कारण हीं दोघें जर जगांत राहिलीं तर त्यांच्या हातून लोकांचें फार कल्याण होईल. मी तर आतां म्हातारा झालों आहें; मला आपल्यापाशीं ने.'

अशी त्याची प्रार्थना होती तरी, जी आनंदाची बातमी मुलांनीं आणिली होती त्यावरून तो त्यांच्याबरोबर गेला. तो त्यांच्या बरोबर पाच्छाच्या सुंदर दिवाणखान्यांत आला. पाच्छानें अन्तोनियसाला पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें. त्या सत्पुरुषाचा पूज्य देखावा पाहून त्याला मोठें नवल झालें. कांहीं वेळपर्यंत तो टक लावून पहात राहिला, व आपल्या मनांत म्हणाला, 'जर माझ्या चुकीकडून अशा सत्पुरुषाचें शीर शिरच्छेद करणाऱ्यांच्या तरवारीच्या सपाट्यांत सांपडलें असतें तर केवढा मोठा अनर्थ घडला असता!'

अबदल्ला अन्तोनियसापाशीं जाऊन त्याचा हात धरून त्याला म्ह०—'लिसीयसानें जशी मला क्षमा केली तशी आपणही कराल काय? व तो जसा आतां माझा मित्र झाला आहे त्याप्रमाणें आपणही व्हाल काय?'

लिसीयसानें अन्तोनियसास आलिंगन देतांच त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. दोघेही सद्गदित होऊन ईश्वराचे उपकार आठवून त्याचे गुणानु-

बाद गाते झाले. हें पाहून अबदल्लासही मोठा गहिंवर येऊन तो लिसीयसाला म्हणाला; 'मलाही तुह्मांस आलिंगन देऊं द्या. या मजपाशीं बसा. आपल्यास एकमेकाशीं फार बोलायाचें आहे.' अबदल्ला त्या मुलांस म्हणाला, 'माझ्या मुलानों, तुह्मीं माझी पत्नी एलमान इजकडे जाऊन जें झालें तें सर्व तिला विदित करा.'

दोन्ही मुलें एकदम मोठ्या आनंदानें उड्या मारीतच त्या सज्जन बाईच्या खोलींत जाऊन म्हणालीं, 'पाच्छानें अन्तोनियसास व आमच्या बापास आलिंगन दिलें; आणि आलिंगन देतांना तो कसा रडला हें आह्मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें. ते तिघेही मित्र होऊन एकत्र बसले आहेत. तुमचे यजमान पाच्छा, यानीं आपणास असें विचारलें कीं, त्यांनीं तुह्मांस भेटण्यास यावें कीं काय?'

पाच्छानें आपला निश्चय बदलून अन्तोनियस व लिसीयस यांच्यावर दया केली; हें ऐकून, एलमान बाईस अगोदरच मोठा आनंद झाला होता; व पाच्छा आपणास विसरणार नाहीं अशी आशा तिला उत्पन्न झाली होती. मोठ्या आनंदामुळें तिला अतिशय गहिंवर आला व त्या मुलांस कंवटाळून घेऊन ती फार रडूं लागली. मुलेंही तिच्या हाताचीं चुंबनें घेऊं लागलीं. जराशी हुशार झाल्यावर ती त्या मुलांस म्हणाली; जलदी माझ्या नवऱ्याकडे जाऊन त्याला सांगा कीं, 'त्याला भेटल्यानें मला फार आनंद होईल.' मुलांनीं लागलाच हा निरोप पाच्छास सांगितला.

अबदल्ला तेव्हांच उठून आपल्या बायकोकडे गेला, आणि दारापाशीं उभा राहून म्ह०—'हे माझ्या जिवलग एलमाने, तूं मला क्षमा करितेस काय? मी तुला अत्यंत दुःख दिलें त्यापासून तुझे हाल होऊन तुला फार त्रास झाला. मी तुझा जीव घेणार होतों. आतां माझें म्हणणें इतकेंच आहे कीं, तूं मजवर रागाऊं नको.'

एलमान बाई उठून त्याच्या गळ्यांत मिठी घालून म्ह०—'आपल्यावर मी कधींच रागावलें नव्हतें. इतकेंच नाहीं तर उलट मी तुम्हांसाठीं प्रार्थना करीत होतें.'

अबदल्ला म्ह०—'तुझ्या प्रार्थना निष्फळ झाल्या नाहींत. नानाप्रकारें मी तुझें मन पाहण्यासाठीं प्रयत्न केला पण देवानें उलट माझेंच मन पालटविलें. मीही ख्रिस्ती होईन अशी मला आशा आहे. तूं ख्रिस्ती झालीस याबद्दल माझें आतां कांहीं म्हणणें नाहीं.'

मग दोघेंही पलंगावर बसून, त्या मुलांची ओळख कशी झाली; त्यांच्या

बालबोधावरून त्यांनीं अन्तोनियसास कसें बोलाविलें. तुर्क लोकांनीं त्या मुमुलांच्या बापास कैद करून कसें आणिलें; तिणें त्या बापाची व मुलांची भेट कशी होऊं दिली हें सर्व एलमान बाईनें पाच्छाला सविस्तर सांगितलें. नंतर ती म्हणाली, 'माझी पक्की खात्री आहे कीं, हें सारें देवाच्या इच्छेनेंच झालें. सबब तुम्ही माझ्यावर रागाऊं नका.'

पाच्छा म्ह०—'जें त्वां केलेंस तें सर्व ठीकच झालें. मी जर तुझ्या ठिकाणीं असतों तर म्यांही तसेंच केलें असतें; पण तुझ्या इतकें माझ्या हातून झालें नसतें. मीही तुझ्याबरोबर ईश्वराचे आभार मानितों.' असें बोलून वर पाहून, त्यानें मोठ्यानें उसासा टाकिला.

पाच्छा म्ह०—'आतां चल, ते मित्र आपल्या साठीं वाट पहात आहेत. आपण आज संध्याकाळीं एका ठिकाणीं मिळून आनंद करूं.'

अबदल्ला आपल्या बायकोच्या हातांत हात घालून, दिवाणखान्यांत आला. त्याची मुखचर्या फार सद्गदित दिसूं लागली. एलमानबाईही आनंदित दिसून तिचे नेत्र प्रेमानें तकाकूं लागले. अन्तोनियस व लिसीयस यांनां तिच्याविषयीं जी काळजी व कळवळा वाटत होता तो त्यांनीं पाच्छास व एलमान बाईस सांगितला. हें पाहून त्या दोन्ही मुलांच्या पोटांत आनंद मावेनासा झाला.

पाच्छा म्ह०—'आज संध्याकाळीं आपण एका ठिकाणीं जेवूं. आज सर्व दिवस मला जेवणाची आठवण झाली नाहीं. तुमचीही तशीच अवस्था झाली असेल.'

ताटें मांडल्यावर ते मोठ्या आनंदानें व सुखानें जेवीत बसले. जेवणास उशीर फार लागल्यामुळें मुलांस डुकल्या येऊं लागल्या; हें पाहून एलमान बाईनें त्यांस निजायास जाण्यास सांगितलें. नंतर एलमानबाई, पाच्छा अन्तोनियस आणि लिसीयस अशीं चौघेंजणें मध्यरात्र टळून जाई पावेतों फार चित्तवेधक, धर्मसंबंधी विषयांवर बोलत राहिलीं.

---

## प्रकरण १६.

## मोठा निश्चय.

दुसऱ्या दिवशीं अबदल्लास इतकें काम होतें कीं, संध्याकाळीं पुष्कळ रात्र होई पर्यंत एक क्षणाचाही अवकाश त्याला मिळाला नाहीं. तो बरेच दिवस नगरांत नव्हता म्हणून आतां आला असें समजतांच पुष्कळ कामगार लोक

त्याकडे येऊन आपापल्या कामाचा हिशेब देऊं लागले. कांहीं दिवस तो त्या कामांत गुंतला होता. एलमानबाईही बहुतकरून आपल्या महालांतच बसून राहत असे. अन्तोनियस व लिसीयस पहिल्याप्रमाणें बागेचें काम करीत राहिले. पण त्यांस स्वदेशीं जाण्याची उत्कंठा उत्पन्न झाल्या-मुळें त्यांस फार दुःखानें दिवस काढावे लागले. लिसीयसानें आपणास मुलांच्या द्वारें गुलामगिरींतून सोडविण्याचें वचन पाच्छानें दिलें होतें त्याची पाच्छास आठवण करण्यासाठीं एलमानबाईस सूचना केली. नंतर अबदाल्ला एके दिवशीं बागेंत जाऊन लिसीयसास व अन्तोनियसास ह्मणाला कीं, तुम्ही आपल्या स्वदेशीं जाण्यास किती उत्कंठित असाल याविषयीं मला सहज अनुमान करतां येतें. पण लवकरच हिंवाळा येईल व कडक थंडींत प्रवास करणें बरें नाहीं. तुमचें खरोखर कल्याण व्हावें असें माझ्या मनांत असल्या-मुळें आतांच तुम्हाला गुलामगिरींतून मुक्त करवत नाहीं. यांत माझा कांहीं स्वार्थ नाहीं हें मी तुम्हास मनापासून सांगतों. तुम्हाला प्रवासाच्या संकटांत घालावें यापेक्षां तुह्मी येथें रहावें हें मला बरें दिसतें. तुह्मासंगतीं आणखी धर्माविषयीं संभाषण करावें असें मला वाटतें. त्यावरून बोध होऊन आनंद ही होईल. माझ्या आत्म्याचें तारण व्हावें यापेक्षां या जगांत मला दुसरें कोणतेंही वैभव मोठें दिसत नाहीं. म्हणून माझ्यानें पूज्य जो अन्तोनियस याला इतक्यांतच पाठववत नाहीं. यासाठीं तुम्हा उभयतांस माझी प्रेमपुरःसर अशी विनंती आहे कीं, आपण आणखी कांहीं दिवस माझ्या येथेंच रहावें.'

या गोष्टीस त्यांनीं रुकार दिल्यामुळें जेव्हां जेव्हां त्याला फुरसत मिळे तेव्हां तो त्यांजपाशीं जाऊन बसे आणि ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेविषयीं अन्तोनियसा-बरोबर फार वेळपर्यंत बोलत बसे. यहूदी लोकांच्या भयामुळें जसा निक-देमस रात्रीं चोरून प्रभु येशूपाशीं येत असे त्याप्रमाणें तुर्क लोकांच्या भीतीस्तव अबदाल्लाही वारंवार फार रात्र झाल्यावर बागेंत ज्या खोलींत अन्तोनियस रहात असे तींत बत्ती पाहिली म्हणजे त्याच्याकडे जाई.

लिसीयस ख्रिस्ती व अन्तोनियस ख्रिस्ती उपदेशक ह्मणून अबदाल्लाचा त्यांच्या बरोबर स्नेह जडला हें पाहून तुर्क लोकांस अगदीं बरें वाटलें नाहीं. तरी पाच्छा पूर्वींचा रागीटपणा सोडून फार सौम्य व दयाळू झाल्यामुळें अर्ज-दारांची दाद लवकर लागे व कोणावर अविचारानें जुलूम झाल्यास त्याचें नुकसान तो भरून देई, यामुळें तुर्क लोकांची मर्जी पाच्छावर बहाल होती.

ख्रिस्तीशास्त्राचें सौंदर्य व सत्यता ह्या दोन गोष्टी स्पष्ट रीतीनें लोकांस दाखविण्याचें अन्तोनियसास चांगलें माहीत आहे हें पाहून अबदाल्ला दिवसानुदिवस फार खुष होत गेला. आदामाचें पतन व तारणाऱ्याच्या येण्याचें वचन यांपासून आरंभ करून ख्रिस्ताच्या ठायीं जुन्या करारांतील जीं भविष्यें पूर्ण झालीं त्यांचा अंतोनियसानें अबदाल्लास नीट बोध करून त्याच्या मनांत ठसण्यासारिख्या रीतीनें येशूची गोष्ट व त्याचा चमत्कारिक जन्म, दूत, मेंढपाळ व ज्ञानी माणसांनीं पूर्वेकडून येऊन गव्हाणींत घेतलेलें ख्रिस्ताचें दर्शन आणि येशूचा बाप्तिस्मा, आकाश उघडणें व आकाशवाणी, येशूचा उपदेश व त्यानें दयेनें केलेले चमत्कार, त्याची दुःख सहन करण्याची शक्ति, त्याचा कांटेरी मुकुट, वधस्तंभ, ज्याच्या योगानें त्यानें मनुष्यांकरितां मरण सोसिलें व आपल्या वधकरणाऱ्यांकरितां प्रार्थना केली त्याची अद्भुत प्रीति, त्याचें गौरवी पुनरुत्थान, त्याचें आकाशांत गमन, पवित्र आत्म्याचें येणें, प्रेषितांस पवित्र आत्म्याची प्रेरणा झाल्यामुळें त्यांनीं जगांत सर्व ठिकाणीं जाऊन केलेला उपदेश व अद्भुत चमत्कार आणि त्यापासून पापी जनांस झालेला बोध या सर्व विषयांचें निरूपण अन्तोनियसानें अबदाल्लास अनेक वेळ केलें; व अबदाल्लानें तें सर्व मन लावून ऐकिलें, व तें ऐकतांना पुष्कळ वेळां त्याच्या डोळ्यांतून अश्रुधाराही गळाल्या.

अन्तोनियस जसा बोध करी तसा तो स्वतः चालत असे व त्याच्या आनंदयुक्त विश्वासाच्या योगानें पाच्छाच्या मनावर त्याचें फारच वजन बसलें. अबदाल्ला आतां धर्माविषयीं फारच विचार करूं लागला. आपल्या खोलींत रात्रीं एकटाच विचार करीत बसे व कधीं कधीं बागेंत टेहळी करतांनाहि अंतःकरणांत या गोष्टींचेंच मनन करी.

एका समयीं त्याची बायको बागेंत येऊन त्याला बागांत बांकावर एकटाच बसलेला पाहून ह्मणाली; ‘अहो, आतांशीं तुह्मी इतक्या विचारांत पडून एकटेच कां बसतां? तुह्मी कशाविषयीं विचार करितां?’ पाच्छा ह्मणाला, ‘अ हा हा! याविषयीं तुला सहज अनुमान करितां येईल. जो धर्म तूं स्वीकारिला आहेस त्याकडे माझें मन लागलें आहे. मी आतांच त्याविषयीं तुझ्या दोन्ही मित्रांबरोबर विचार करीत होतों. ते खचित सज्जन गृहस्थ आहेत. अन्तोनियस हा फार सौम्य असून त्याचें प्रेम देवावर व माणसावर अतिशय आहे. तो इतका साधा, प्रामाणिक व न्यायी आहे कीं, त्याची स्तुति जितकी करावी

तितकी थोडीच. त्याप्रमाणेंच लिसीयसही फार योग्य असून त्याला जगिक गोष्टींचा इतका अनुभव आहे कीं, त्याचें लक्ष्य द्रव्यसन्मान व सुख यांकडे अगदीं नाहीं. उभयतांच्या अंतःकरणाची ओढ केवळ देवाच्या सन्मानाकडे व मनुष्याच्या कल्याणाकडे असावी. बहुतकरून सर्व तुर्क लोक पाहा कसे लोभिष्ट, घातकी, खुनी, गर्विष्ठ आणि कुव्यसनी आहेत. या गृहस्थांत व त्यांच्यांत किती अंतर आहे. हीं दोन मुलें फिलेमोन व तिमथ्यस किती चांगलीं लेंकरें आहेत! बापावर त्यांची प्रीति असून त्यांच्या उपदेशकाच्या सांगण्यास ते किती मान देतात, व किती त्यांच्या कह्यांत आहेत. तीं नेहमीं आनंदित असून कशीं परोपकारी आहेत. त्यांच्या धैर्याचें तर मला मोठेंच आश्चर्य वाटतें! ते आपल्या बापाबरोबर मरण्यास तयार झाले. आपण आकाशांत जाऊं अशी त्यांस पूर्ण खात्री होती त्याचें मला फार नवल वाटलें. त्या प्रसंगीं त्यांनीं दाखविलेलें धैर्य मी कधींही विसरणार नाहीं. माझ्या जिवलग प्रिये, तूंही नेहमीं सौम्य व आनंदी असत्येस. मी तुझ्या तोंडावर तुझी स्तुति करितों असें नाहीं. तूं ख्रिस्ती झाल्यापासून खरोखरच मला आकाशीय दिव्य दूतांप्रमाणें दिसत्येस. तुझा वध करण्यास मी वाघाप्रमाणें तयार झालों, तें सर्व विसरून तूं अजूनही माझ्याबरोबर सौम्यपणानें वागत्येस. किती हा तुझा उदारपणा! आजपर्यंत त्या गोष्टी काढून त्याबद्दल मला कधीं दोषही दिला नाहीं.' असें बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या व तो तिला कवटाळून धरून ह्मणाला कीं, जो धर्म मनुष्यास इतकें चांगलें करितो, तो वास्तविक खरा व चांगला धर्म असावा. आतां माझाही ख्रिस्ती होण्याचा पुरा निश्चय झाला.'

---

## प्रकरण १७.

## ख्रिस्तीभक्ति.

अबदाल्लानें लवकरच आपला ख्रिस्ती होण्याचा निश्चय आपल्या दोन मित्रांस सांगितला. हें ऐकून त्या उभयतांस मोठा आनंद होऊन ते परमेश्वराची उपकारस्तुति करूं लागले. अबदाल्ला त्यांस ह्मणाला कीं 'ही गोष्ट तूर्त कोणास कळवूं नका. ही गुप्त ठेवण्याचीं कारणें सबळ आहेत. मध्यंतरीं माझ्या मनांत असें आहे कीं, माझ्या हवेलींत भक्तीकरितां एक लहानसें भज-

नालय तयार करावें. हें कोणास कळूं द्यावयाचें नाहीं. या कार्यासाठीं आजपर्यंत ज्या खोलींत मी आपला खजीना ठेवीत असें व जिकडे मी कोणास जाऊं देत नसें ती खोली फार चांगली आहे. इतकेंच कीं, सर्व काम उत्कृष्ट व सुंदर असावें. याविषयीं तुह्मी दोघेजण एकत्र मिळून विचार करा. जें सामान बाहेरून मागवावयाचें तें सर्व पेट्यांत बंद करवून माझे नांवें मागवा म्हणजे सरहद्दीवर जेव्हां त्या पेट्या येतील तेव्हां जकातीच्या चौकीवर त्या कोणी न उघडतां जितकी त्वरा होईल तितकी करून जलद रवाना करण्यास जकातदारास फरमान पाठवीन. माझ्या बायकोला याविषयीं कांहीं सुद्धां कळवूं नका. माझ्या मनांतून तिला एकाएकी दंग करावयाचें आहे.'

लिहिल्याप्रमाणें सर्व सामान वाटलें होतें त्याच्या अगोदरच येऊन दाखल झालें हें पाहून अबदाल्ला फार चकित होऊन खुष झाला. जेव्हां अन्तोनियसानें व लिसीयसानें मंदीर तयार करण्यास आरंभ केला, तेव्हांही अबदाल्लास फार आनंद झाला असता; पण कांहीं जरूरीच्या कामाकरितां त्याला एका दूरच्या शहरीं जाणें पडलें. त्याच्या दोन मित्रांस त्यामुळें कांहीं विशेष वाईट वाटलें नाहीं, कारण त्यांच्या मनांतून पाच्छालाही एकाएकीं दंग करावयाचें होतें.

अबदाल्ला प्रवासाहून घरीं आल्यावर लागलाच देऊळ पाहावयास गेला. तें पाहून तो वास्तविक दंग होऊन त्यानें एलमानबाईस बोलावून तिला आपल्या बरोबर आंत नेलें. तिलाही तें देऊळ पाहून मोठा आनंद झाला.

मग अबदाल्लाचा बाप्तिस्मा करण्यासाठीं नेमिलेला दिवस येऊन ठेपला. अन्तोनियसानें अबदाल्लास पवित्र बाप्तिस्म्याच्या संस्काराचें नीट निरूपण करून ठेविलें होतें. बाप्तिस्म्याच्या दिवशीं अबदाल्ला आपल्या पत्नीसह लिसीयसाबरोबर देवळांत आला. त्याच्या मागून अन्तोनियसही आला. अबदाल्लानें मोठ्या गंभीर वाणीनें मतांगीकार म्हणून दाखविला. नंतर अन्तोनियसानें त्यास पवित्र बाप्तिस्मा देऊन त्याच्या आग्रहास्तव त्याचें नांव पौलस ठेविलें. अबदाल्ला म्हणाला 'हा वेळपर्यंत मी शौल होतों पण आतां परमेश्वरापाशीं माझी अशी प्रार्थना आहे कीं, म्यां पौलस व्हावें व त्याचें साधुत्वही मला प्राप्त व्हावें.' त्याच्या बाप्तिस्म्याच्या वेळीं लिसीयस हा त्याचा साक्षी होता. आपल्या पतीचा बाप्तिस्मा पाहून एलमानबाईस तिच्या बाप्तिस्म्याच्या वेळची आठवण झाली व ती मनांत म्हणाली, 'माझा बाप्तिस्मा झाल्या दिवसापासून मी किती सुखी

आहें! पवित्र बाप्तिस्म्याचा संस्कार आटोपल्यावर लागलीच अन्तोनियसानें प्रभु-भोजनाचा पवित्र संस्कार केला. पौलस व एलमानबाई यांनीं प्रभुभोजन घेतल्यावर मोठ्या आग्रहानें पहिल्यानें प्रार्थना केली. नंतर अन्तोनियस त्यांस म्हणाला, 'माझ्या लेंकरांनो, ह्या संस्काराकडून ईश्वर आपला आशीर्वाद तुम्हांस देऊन सार्वकालिक जीवनाकरितां तुह्माला तयार करो!'

हें सर्व आटोपल्यावर प्रार्थना व ध्यान करण्याकरितां मंडळी आपापल्या खोलींत गेली.

---

## प्रकरण. १८

### कूच.

लिसीयस आपल्या दोन पुत्रांसह स्वदेशीं जाण्यासाठीं पहिल्यापेक्षां अधिक उत्कंठित झाला. अबदाल्ला त्याला म्हणाला, 'ह्यासाठीं मला तुम्हांस दोष देववत नाहीं. कांतर माझा स्वत:चा बेत ह्या देशीं फार दिवस राहण्याचा नाहीं. पण माझें निघणें एव्हांच होत नाहीं; कारण अन्यायानें ज्या कोणाचें नुकसान म्यां केलें असेल तें त्यांस भरून देणें मला भाग आहे. नंतर सुलतानास मी आपल्या कारभारचा हिशेब देऊन माझा राजीनामा देण्यास त्याची परवानगी मागेन. त्याला जरी कळलें कीं, मी तुर्की धर्म सोडला तरी कांहीं हरकत नाहीं, मी केवळ प्रामाणिक मनुष्य आहें इतकीच त्याची खात्री झाली म्हणजे झालें. मग जो धर्म मी स्वीकारिला आहे, म्हणून त्याच्यानें मजवर दोष ठेवणार नाहीं. माझ्या बायकोनें जी मोठी मालमत्ता माझ्याकरितां आणिली आहे, तिचा मी चांगला बंदोबस्त ठेवीन. तिचें किंवा गरीब लोकांचें नुकसान मी करणार नाहीं. एकाद्या भलत्या लुटाऱ्याच्या हातांत जाण्यापेक्षां माझ्या बायकोजवळच सर्व मालमत्ता राहील तर बरें; कारण तसें झाल्यास गरीबाच्या हितासाठीं माझ्या बायकोस तिचा चांगला उपयोग करतां येईल आतां सर्व गोष्टींत माझें कर्तव्यकर्म ख्रिस्ती मनुष्यानें करावें तसें करीन.

इकडे एलमानबाईच्या मनांत आलें कीं, लिसीयसाकरितां व त्या दोन्ही मुलांकरितां नवे चांगले पोषाख तयार करावे. त्या नगरांत जे ख्रिस्ती गुलाम होते त्यांत हंगारी देशांतील एक तरुण पुरुष शिंप्याच्या कामांत फार चतुर होता. त्याचे चतुराईमुळें त्याच्या धन्याला पुष्कळ मिळकत होत असे, त्या

तरुण पुरुषास एलमानबाईनें बोलावून सांगितलें कीं, 'लिसीयसासाठीं व त्याच्या दोन मुलांसाठीं पोषाख तयार कर.' तो म्हणाला, 'बाईसाहेब मी मोठ्या खुषीनें तयार करीन. तुर्क पोषाखांपेक्षां हंगारी पोषाख मला चांगले करतां येतात. काम तयार झाल्यावर आपण खुष व्हाल; आणि जे कोणी तें काम पाहतील तेही खुष होतील.'

नंतर कापड बेतावयाचें होतें म्हणून एलमानबाईनें तिमथ्यसास व फिलेमोनास बोलाविलें. बेत घेतल्यावर तो त्याच्याकडे पाहून म्हणाला, 'कायहो हा चमत्कार! एकाचें मेज घेतलें असतां दोघांचे पोषाख तयार करतां येतात!' त्याचें मेज घेतल्यावर एलमानबाईनें त्या मुलांस सांगितलें कीं, 'या शिंप्याला लिसीयसाकडे घेऊन जा.' थोड्या दिवसांनीं शिंप्यानें कपडे तयार करून आणिले. ते त्यांच्या अंगांत बरोबर बसले. एलमानबाईनें त्याच्या कामाची तारीफ करून त्याला जी शिलाई देऊं केली होती त्याशिवाय आणखी चिरीमिरी देऊन सांगितलें कीं, 'माझी अशी खातरी आहे कीं, पाच्छा माझ्या विनंतीवरून तुझ्या धन्याला पैसे भरून तुला गुलामगिरींतून मुक्त करील.' नंतर तो शिंपी एलमानबाईच्या हाताचें चुंबन घेऊन चालता झाला.

पण लिसीयसाच्यानें आपल्या दोन पुत्रांसुद्धां दीड वर्षपर्यंत तेथून निघवलें नाहीं. कांहीं कामामुळें अबदाल्लास देशच्या सरहद्दीवर जाण्याचें पडलें. तेव्हां तेथपर्यंत त्यांचे मनांत याजबरोबर जावयाचें होतें. तरी हमेष कोणत्या ना कोणत्या दुसऱ्या कामामुळें त्यांच्या जाण्यास हरकत येई. एलमानबाईच्या मनांत होईल तितकें त्यांचें जाणें दूरवर टाकावें, कारण आईप्रमाणें त्या दोन लेंकरांवर तिची ममता बसली होती. तशांत लिसीयस फारच आजारी पडला होता. व प्रवास करण्यासारखी त्याची प्रकृति पुनः ताळ्यावर येण्यास त्याला बरेच दिवस लागले.

तो बरा झाल्यावर ज्या दिवशीं त्यास निघावयाचें तो दिवस येऊन सर्व निघायास तयार झाले, हें पाहून तीं दोन्हीं मुलें फारच रडूं लागलीं. एलमानबाई म्हणाली, 'बाळांनों, तुम्ही कां रडतां?' मुलें म्हणालीं, 'हाय हाय! आम्ही आतां तुम्हांस सोडून कसें जावें?" एलमानबाई म्हणाली, 'इतकेंच तुमच्या रडण्याचें कारण काय? असें असेल तर मुलांनो शांत व्हा, रडूं नका. कांतर माझ्या बाळांनो, लवकरच आपण पुनः एकमेकांस भेटूं.' एलमानबाईची भेट घेतल्यावर तीं मुलें फुंदत फुंदत जाऊन त्यांचा प्रिय शिक्षक जो अन्तोनियस

त्याला भेटावयास गेलीं. हें पाहून, अबदाल्ला त्यांस ह्मणाला,' मुलांनो, तुम्हांस वाटतें कीं तुम्ही जग सोडून एकदम जातां. असें अगदीं समजूं नका. तुह्मी केवळ आपल्या स्वदेशीं जात आहां. आम्हीं लवकरच तिकडे येऊं. आपण सर्व एक्याच ठिकाणीं राहूं.'

अन्तोनियस म्हणाला,' आपण ह्मणतां तसेंच खरें. आपले आप्त, आई-बाप किंवा भाऊबहिणी जेव्हां या जगांतून सर्वकाळच्या प्रवासास निघतात तेव्हां त्यांचा व आपला वियोग थोडाच वेळपर्यंत होतो. आपला वास्तविक स्वदेश ह्मटला ह्मणजे आकाशच होय. तेथें सर्व आपण एकाच ठिकाणीं राहूं. याकरितां मुलांनों शांत व्हा; जेव्हां जेव्हां आपला वियोग होतो, तेव्हां एवढेंच आपल्यास समाधान असतें कीं, आपण या जगांत किंवा आकाशांत खचित भेटूं!'

मुलांचे डोळे सुकून तीं जरा शांत झालीं. इतक्यांत गाडी दाराशीं येऊन ठेपली, घोडेस्वार आपापल्या घोडयांवर बसून गाडीजवळ येऊन उभे राहिले. हे स्वार त्यांच्या रक्षणाकरितां बरोबर जाणार होते. अबदाल्ला व लिसीयस बरोबर गाडींत बसले. तिमथ्यस व फिलेमोन त्यांच्या मागून बसले. अबदाल्ला आणि लिसीयस यांनीं एलमानबाई व अन्तोनियस त्यांच्याकडे पाहून गाडींतून सलाम केला. मुलेंही फार वेळपर्यंत सलाम करीत राहिलीं.

---

## प्रकरण ११.

### जवाहिऱ्या.

अबदाल्लाची गाडी सरहद्दीवरील नगरांत सुरक्षित येऊन पोहोंचली. पाच्छास पाहण्याकरितां रस्त्यांत व वेशीजवळ पुष्कळ लोक जमा झाले. संभावित लोकांकरितां उतारशाळेंत जी मोठी खोली तयार केली होती तेथें गाडी आणून उभी केली. पाच्छा गाडींतून उतरून उतारशाळेच्या कारभाऱ्यास म्हणाला कीं, ' येथें सर्वांहून जी उत्तम खोली असेल ती खोली आम्हाला दाखवा.' तेव्हां कारभाऱ्यानें पाच्छाला एक खोली दाखविली. त्या खोलींत जरी सर्व प्रकारचें उत्तम सामान नव्हतें तरी त्या खोलीच्या खिडक्यांतून हंगारी देश फार चांगला दृष्टीस पडत असे. लिसीयस खिडकीजवळ जाऊन आपल्या स्वदेशांतील डोंगराकडे पहात उभा राहिला. शेवटीं त्याचे डोळे

भरून येऊन तो आकाशाकडे पाहून ईश्वराची उपकारस्तुति करीत म्हणाला; ‘हे परमेश्वरा, इतक्या संकटांतून तूंच आह्मास पार पाडून सुरक्षित रीतीनें माघारें आणिलेंस.’ इतक्यांत एक माणूस फार छान तुर्की पोषाख करून बगलेंत एक पेटी घेऊन त्याच खोलींत आला; आणि पाच्छास अदब बंदगी करून म्हणाला, ‘सरकार आपण माझ्या मालपैकीं कांहीं जिनसा विकत घ्याल काय? मी सर्व प्रकारच्या मोलवान् जिनसांचा म्हणजे पुरुषांच्या व बायकांच्या चोख सोन्याच्या व खऱ्या जवाहिराच्या सर्वोत्कृष्ट दागीन्यांचा व्यापार करीत असतों. माझें सर्व सामान चांगलें असून स्वस्त आहे. त्याची किंमत माफकच आहे.’

पाच्छा हो नाहीं म्हणतो इतक्यांत त्यानें दागिने व जिनसा मेजावर दाखविण्याकरितां काढून ठेविल्या आणि ह्मणाला, ‘या अंगठ्या व गोट व तोडे जडावाचे आहेत. या सोन्याच्या ठुशा. या सर्वांतून सरकारांनीं कांहीं जिन्नस विकत घेऊन घरीं बाईसाहेबांस बक्षिस करावे.’ इतक्यांत लिसीयस त्या मेजापाशीं येऊन जे दागिने त्यावर ठेविले होते ते हातीं घेऊन त्याची परीक्षा करूं लागला. तोही व्यापारी होता ह्मणून त्याला असल्या जिनसांची पारख चांगली होती. त्या जिनसा पाहून लिसीयस ह्मणाला, ‘हे दागिने खरे नाहींत.’ त्यावर तो व्यापारी ह्मणाला;‘ जो कोणी असें म्हणतो त्याला जडावाच्या दागिन्यांची अगदीं परीक्षा नाहीं.’ असें म्हणून फिरून पाच्छास मुजरा करून ह्मणाला, ‘सरकार असल्या जिनसांचे पारखी आपण आहांत असें मला दिसतें.’ लिसीयस त्याच्या तोंडाकडे टक लावून त्याला म्हणाला; ‘अरे लबाडा, पुष्कळ दिवसांपासून मी तुला ओळखतों; माझ्या गांवांतील एका गृहस्थास फसवून त्यापासून बरीच मोठी रक्कम तूं उपटलीस.’ व्यापारी ह्मणाला, ‘सरकार असें अगदीं नाहीं. हा गृहस्थ जें कांहीं म्हणतो तें सर्व खोटें आहे. मी याला कधीं पाहिलेंही नाहीं; व याची माझी ओळख देखील नाहीं.’ असें बोलून लवकर लवकर आपला पसारा आटोपून जाण्याच्या लागांत होता, इतक्यांत तिमथ्यस व फिलेमोन खोलींत आले. त्या व्यापाऱ्याला पाहून तिमथ्यस एकदम ह्मणाला, ‘याच माणसानें आपल्याला चोरून नेलें होतें.’ फिलेमोन म्हणाला, ‘होय, खचित् हाच तो माणूस’ यानेंच आपल्याला चोरून नेलें. आह्मी या गांवांत येतांच हें गांव ओळखलें. आम्हांस चांगली आठवण आहे कीं, आम्ही या गांवीं पूर्वी आलों होतों.’ तिमथ्यस

खालीं पाहून म्हणाला,' ह्याच खोलींत यानें आह्मास विकून याच मेजावर आह्माला विकलें त्याचे पैसे मोजून घेतले.' फिलेमोन ह्मणाला, 'त्या वेळीं ह्या जाग्याचा कारभारी या मेजाजवळ उभा होता. आम्हाला पाहून त्याला आमची कींव आली खरी पण त्याच्यानें आमचा बचाव करवेना. पण आतां आमचीं ओळख त्याला पटत नाहीं.'

व्यापारी आपली पेटी बगलेंत मारून भीत भीत उभा राहून या सर्व गोष्टी नाकबूल गेला आणि ह्मणाला;' मी या दोन तरुण गृहस्थांस ओळखत नाहीं. ज्यांवर पाच्छाची मेहरबानी अशा या दोन सुंदर मुलांस विकील इतका कोणी दुष्ट असेल काय! असला तर त्याला ठार मारून टाकावें!'

पाच्छानें कारभाऱ्याला बोलावून विचारलें कीं, 'तूं या दोन मुलांस ओळखतोस काय?' तीं दोन्हीं मुलें त्याच्या पुढें येऊन उभीं राहिलीं. त्यांस न्याहाळून पाहून त्यानें ह्मटलें, 'होय, मी यांस ओळखतों. हे पूर्वी येथें आले होते. पहिल्यानें मी त्यांस ओळखलें नाहीं. कां कीं ते आतां फार मोठे झाले. त्यांच्या सारखेपणाचें मला फारच नवल वाटतें. ते अजून तसेचे तसेच आहेत. आतां मला पक्की खूण पटली कीं हींच तीं मुलें. जो मनुष्य येथें उभा आहे त्यानेंच यांस विकलें. त्या माणसाविषयीं मला कांहीं सांगायाचें नाहीं. विकल्या दिवसापासून मी त्याला आजपर्यंत पाहिलें नाहीं व त्याच्याविषयीं कांहीं ऐकिलेंही नाहीं.'

नंतर पाच्छानें नगरांतील काजीस बोलाविलें. तो त्या घराच्या समोरल्या खोलींत होता. काजीस पाच्छानें विचारलें; 'तुम्हाला या माणसाची माहिती आहे काय?' काजी ह्मणाला; 'या माणसाची व माझी खुद्द ओळख नाहीं, मला येथें येऊन एक वर्ष देखील झालें नाहीं. थोडया दिवसांमागें प्रथमच तो माझ्या पाहाण्यांत आला. माझ्या कारभाऱ्यानें मला एका जवाहिऱ्याविषयीं सांगितलें होतें तो हाच असावा. हा रंग पाहून त्याप्रमाणें तो आपल्याला कधीं कधीं खिस्ती व कधीं कधीं तुर्की ह्मणवितो. याविषयीं आणखीं असें ऐकिलें आहे कीं, हा पोलंदांतील कोणी यहूदी आहे. पण याविषयीं माझी खातरी नाहीं. तो कोणीं कां असेना, त्यावर माझी नजर आहे व आपल्या शिपायांस व हेरांस त्यांची सोदेगिरी दिसतांच त्याला पकडण्याविषयीं हुकूम दिला आहे. आतां त्याची सोदेगिरी अनायासें उघडकीस आली.'

नंतर पाच्छानें लिसीयसास म्हटलें; 'या माणसाच्या मागील वर्तणुकीविषयीं आणखी कांहीं तुम्हांस माहित असल्यास सांगावें.' लिसीयस म्हणाला, 'या सोद्यानें एका प्रामाणिक पण भोळकट व्यापाऱ्यापासून त्याला एक खोटी हुंडी विकून तिचे पैसे उपटले. ज्या माणसाला त्यानें फसविलें तो माणूस ती हुंडी विकण्यास गेला पण ती खोटी निघाली हें पाहून तो फार दुःखित झाला. त्यानें त्याच्यावर फिर्याद केली. पण या ठकानें नाकबूल जाऊन असें सांगितलें कीं, "जी हुंडी मी विकली होती ती खरी होती, पण ह्या व्यापाऱ्यानें ती बदलली.' ह्या संकटामुळें तो बिचारा व्यापारी मजकडे आला. मला त्याची दया येऊन मी आपल्या वकिलास त्याविषयीं सांगून त्याबद्दल लागेल तो सर्व खर्च वकिलास देण्याचें कबूल केलें आणि या सोद्याला कैद करविलें; पण यानें एक फार हुषार वकील करून खटला फार दिवस चालविला. शेवटीं निकाल होऊन या सोद्याला त्या हुंडीचे पैसे व फिर्यादीचा खर्च देणें भाग पडलें. निकाल होईपर्यंत हा तुरुंगांत होता. सबब कोडताला असें वाटलें कीं, ही शिक्षा त्याला पुरे आहे. पण त्याच्या अशा सोदेगिऱ्या वारंवार उघडकीस आल्या कारणानें तो सुधरेपर्यंत त्याला पोलिसाच्या स्वाधीन केलें. तेव्हां त्याच्या वकिलानें त्या सोद्याला विचारिलें कीं, "आम्ही काय करावें? जो शिक्षेचा ठराव झाला आहे त्याला आह्मी मान्य व्हावें किंवा वरिष्ठ कोडतांत अपील लावावें?" त्यावर त्या लुच्चानें उत्तर दिलें कीं, "जर पोलीस चुकेल तर मी पैसे देण्यास कबूल आहें." हें ऐकून सर्व लोक हांसूं लागले पण पाच्छा न हंसतां म्हणाला कीं, 'या दुष्ट माणसानें पोलिसास गुंडाळून ठेवून स्वतः सुधारण्याचें सोडून दिलें. माझ्यानें किंवा दुसऱ्याच्यानें त्याला जबरदस्तीनें कांहीं सुधारवत नाहीं. तरी त्याला पुढें दुष्टाईकरितां येणार नाहीं असा बंदोबस्त मला करतां येईल. वाईट कर्मे करून हा पका हरामखोर बनला आहे. तुरुंगांतून त्याची सुटका होतांच सूड उगविण्याच्या इराद्यानें व जे पैसे त्यानें गमाविले होते ते पुनः मिळविण्याच्या बेतानें ह्यानें ह्या मुलांला चोरिलें. पूर्वीं त्यानें खोटया हुंडया करून लोकांस ठकविलें. आतांही खोटें जवाहीर विकून तो लोकांस फसवितो. म्हणून अशा लेंकरें लुटणाऱ्याच्या पायांत बेडया ठोकून त्यास गुलाम करून शिशाच्या खाणींत सक्तमजुरी करण्यास लावावें. तेथें सक्त मेहनतीनें व माफक खाण्यानें त्याला आपल्या दुष्टाईचें योग्य फळ प्राप्त होईल.'

हें ऐकून लिसीयस म्हणाला—'त्याच्या कर्मांचें फळ त्याला देवापासून

प्राप्त झालें आहे! याच खोलींत त्यानें माझ्या दोन मुलांस गुलामगिरी करिण्यास विकलें; व त्याच खोलींत त्याला स्वत: गुलामगिरीची शिक्षा प्राप्त झाली. वाईट करणाऱ्यांस कसें हुडकून काढावें हें ईश्वरालाच माहीत आहे. यावरून सर्व लोकांनीं सावध होऊन प्रामाणिकपणें व खरेपणानें अंतरसाक्षी जो परमेश्वर त्यासमोर भिऊन चालावें अशी माझी प्रार्थना आहे.'

दुसऱ्या दिवशीं सकाळीं लिसीयस व त्याचीं दोन मुलें पुढील प्रवास करण्यास तयार झालीं. लढाईंत मालमत्तेची लूट झाल्यामुळें जें लिसीयसाचें नुकसान झालें होतें तें भरून देण्यास पाच्छानें द्रव्य दिलें. शेवटीं लिसीयसास आलिंगन देऊन पाच्छानें त्याच्या दोन्ही मुलांचें चुंबन घेतलें. नंतर पाच्छा त्यांस उराशीं धरून म्हणाला; 'तुम्ही दोघेजण माझे दिव्य दूत आहांत. कांतर जो मी वाघासारखा क्रूर मनुष्य होतों त्या मला तुम्ही ईश्वरी साह्यानें कोंकराप्रमाणें नम्र केलें आहे.'

मुलांसही गहींवर दाटल्यामुळें ते स्फुंदूं लागले म्हणून त्यांच्यानें बोलवेना. त्यांच्या बापाचीही तशीच अवस्था झाली. ते गाडींत बसत तोंपर्यंत अबदाल्ला त्यांच्या बरोबर गेला व गाडींत बसतेवेळीं त्यांस ह्मणाला, 'तुह्मांस व तुमच्या बापास ईश्वरानें सुरक्षित ठेवावें.' गाडी दूर गेली असें पाहून तो मोठयानें ओरडून ह्मणाला 'जर ईश्वराची इच्छा असेल तर एक वर्षांत आपली भेट होईल!'

---

## प्रकरण २०.

### सज्जन शिक्षक.

लिसीयस व त्याचे दोन पुत्र पुन: आपल्या गांवीं आले अशी बातमी अकस्मात् गांवांत चोहोंकडे पसरली. ह्मणून गांवांतील लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्याला सामोऱ्या आल्या. त्याच्या जुन्या मित्रांपैकीं एक म्हणाला; 'तुमचें तोंड पुन: आमच्या दृष्टीस पडलें म्हणून आह्मी ईश्वराचे उपकार मानितों. ईश्वर किती उत्तम! त्याची करणी किती अगाध! तुह्मी आपल्या पुत्रांसहित परत आलां, यावरून आम्हास मोठा आनंद झाला. मागें तुम्हास असें वाटलें होतें कीं, तुमचे पुत्र तुमच्या दृष्टीं पडणार नाहींत. आतां हे मोठे व फार सुंदर दिसतात. हे आतां तारुण्यावस्थेंत आले आहेत. याकरितां ईश्वराची कितीही उपकारस्तुति केली तरी ती थोडीच!'

नंतर लिसीयस त्या महालांत जी त्याची वतनवाडी होती ती पाहण्यास गेला. तेथेंही त्याच्या पुत्रांस पाहिल्यानें लोकांस मोठा आनंद झाला. सर्व गांव येऊन त्याजवळ जमा झाला. जे भले लोक तीं मुलें चोरीस गेल्यामुळें शोक करीत होते त्यांच्या डोळ्यांतून त्या मुलांस भरज्वानींत त्यांच्या सज्जन बापाबरोबर पाहून आनंदाश्रु वाहूं लागले!

त्या गांवीं लिसीयसाचें जें घर होतें तें अगदीं मोडकळीस आलें होतें. म्हणून तें आंतून व बाहेरून दुरुस्त करण्याचें काम चालविलें. त्याच्या बागेंत जे फुलांचे वाफे होते ते तर अगदींच नाहींसे होऊन त्या ठिकाणीं लोकांनीं गाजरें व मुळे लाविले होते. लिसीयसानें जो फळबाग केला होता तो मात्र जशाचा तसाच कायम असल्यामुळें त्याच्या वतनवाडीची कांहीं शोभा राहिली होती. त्यांत फळांचीं जीं लहान लहान रोपें पूर्वी लिसीयसानें लाविलीं होतीं त्यांचे मोठाले वृक्ष होऊन त्यांच्या फांद्या आतां चोहोंकडे पसरल्या होत्या. परत आल्यानंतर लिसीयसाचे वतनवाडी नीटनेटकी करण्यांत जवळ जवळ एक वर्ष निघून गेलें. पुनः वसंतऋतु येऊन ठेपला. जिकडे तिकडे कोंवळी हिरवळ फुटून फार सुंदर देखावा दिसूं लागला. त्यांस दिवसां फार काम पडे म्हणून संध्याकाळीं ते खेडेगांवीं स्वच्छ हवा घेण्यास आणि ईश्वराच्या अद्भुत कामावरून दिसणारी त्याची दया व गुणानुवाद, यांचें गायन करून आनंद करण्यास जात असत.

एक्या सुंदर सायंकाळीं दोन्हीं मुलें दरवाजाच्या बाजूस बांकावर बसलीं होतीं. त्यांचा बाप घरांत पत्रें लिहीत होता. इतक्यांत पायवाटेनें एक चमत्कारिक भटकणारा माणूस एकटाच त्यांच्या दारावरून जातांना त्यांनीं पाहिला. त्याच्या अंगांत तपकिरी रंगाचा झगा असून उजव्या हातांत एक सोडगा आणि डाव्या हातांत एक पुस्तक होतें. डोकीला काळी टोपी होती. त्या गांवीं त्या म्हाताऱ्याची अगदीं ओळख नाहीं असें पाहून फिलेमोन म्हणाला; 'आपण त्याला आज रात्रीं येथें राहण्यास बोलावूं. त्याच्या योगानें आपल्याला कांहींतरी आशीर्वाद मिळेल.' असें म्हणून त्याला भेटण्यासाठीं ते पुढें झाले. पण तो म्हातारा हात पुढें करून त्या मुलांस म्हणाला; 'माझ्या प्रिय बाळांनो, ईश्वर तुमचें कल्याण करो! या गांवांत तुम्हीच मला पहिल्यानें भेटलांत म्हणून मी ईश्वराचा फार आभारी आहें!' दोघेही आनंदानें म्हणाले;'हा तर आपला प्रिय शिक्षक!' लागलेंच

मुलांनीं त्याला आलिंगन दिलें आणि म्हणाले. 'हे अन्तोनियसा, आपण आम्हांस पुन: भेटलां यावरून आम्हांला आनंद झाला?'

प्रथम त्यांची ओळख पटली नाहीं. कारण अन्तोनियस तुर्कस्थानांत नित्य माळ्याचा पोशाख करीत असे. म्हणून ओळखतांच मुलें म्हणालीं," चला, आमच्याबरोबर आपण बाबाकडे या; आपणास पाहून बाबांस फार आनंद होईल. असें म्हणून त्या दोघांनीं त्याच्या हातांत हात घालून त्याला आपल्या बापाकडे नेलें. त्यास पाहून बापाला मोठा आनंद झाला. लिसीयस व अन्तोनियस हे दोघे एकमेकांस आलिंगन देत असतां त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या; नंतर अन्तोनियस प्रवासानें फार थकल्यामुळें खालीं बसून विसांवा घेऊं लागला. लिसीयस त्याच्या समोर बसून ह्मणाला, 'आपले स्नेही अबदाल्ला व त्यांची पत्नी काय करीत असतात बरें. त्यांचा इकडे येण्याचा हेतु सिद्धीस जाईल काय?' अन्तोनियस ह्मणाला, 'सर्व खुशाल आहेत. पाच्छा लवकरच इकडे येतील. त्यांना सोडून आज मला दीड महिना झाला. त्यांच्या अगोदर निघण्याचें कारण हेंच कीं, अजून मी जीवंत आहें हें माझ्या ख्रिस्ती भावांस कळावें. अबदाल्लास हें बरें वाटलें म्हणून त्यानें मला खुषीनें अगोदर येऊं दिल्हें. तुर्क देशांत गुलामगिरींत सांपडून मी मेलों असें ज्या मित्रांस वाटलें होतें त्यांस मला पाहून जो आनंद झाला तो सांगतां येत नाहीं. माझी हकीकत त्यांनीं फार मन लावून ऐकिली. अबदाल्ला व एलमानबाई हीं उभयतां ख्रिस्ती झालीं म्हणून ते मनापासून देवाचे उपकार मानूं लागले. जेव्हां मी तुह्माविषयीं त्यांना सांगितलें तेव्हां तर त्यांस फारच आनंद झाला. माझी हकीकत संपल्यावर एक सज्जन गृहस्थ मला ह्मणाला, " शास्त्रांत काय सांगितलें आहे याची आठवण तुम्हाला असेल—'परमेश्वरावर आवड ठेव म्हणजे तुझ्या हृदयांतली मागणी तो तुला देईल.'—तुमचा मानस जे ख्रिस्ती नाहींत त्यांनीं ख्रिस्ती व्हावें एतदर्थ यत्न करावयाचे होते तो देवानें सिद्धीस नेला." म्हणून त्याचे उपकार मानिले पाहिजेत. दुसरा म्ह० "तुम्ही निघतांना मी तुम्हास सांगितलें होतें कीं,—'तूं आपला मार्ग ईश्वराला निरीव म्हणजे तो तुझें सहाय करील.'—हेंही शास्त्राचें म्हणणें पूर्ण झालें. सर्व अडचणी निवारण होऊन तुमचें कार्य सिद्धीस गेलें." मी आतां कृतकृत्य झालों. आतां कांहीं राहिलें नाहीं. इत-

कीच माझी इच्छा आहे कीं, अबदाल्ला व त्याची पत्नी यांचें येणें इकडे व्हावें.—ईश्वरेच्छा असल्यास लवकर तसें होईल.'

## प्रकरण २१.

### भेट.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं अन्तोनियस लिसीयसास व त्याच्या पुत्रांस म्हणाला. 'आज कदाचित् अकस्मात् आनंद प्राप्त होईल. सर्व यथास्थित असल्यास आज सायंकाळीं अबदाल्ला व एलमानबाई एथें येऊन पोहोंचतील. काल रात्रीं हें मी तुम्हास सांगितलें नाहीं याचें कारण हेंच कीं, जर माझ्या ह्मणण्याप्रमाणें ते आले नाहींत तर तुमचें मन खट्टू होईल. तुह्मांस मोकळ्या मनानें सांगावें हें बरें आहे. आपले मित्र लवकरच येणार आहेत.' हें ऐकून लिसीयसास व त्याच्या दोन पुत्रांस मोठा आनंद झाला.

संध्याकाळ होण्यापूर्वीं दोन्हीं मुलें ह्मणालीं, 'चला आपण आपल्या प्रिय पाव्हण्यांस सामोरे जाऊं.' त्यांचा बाप म्हणाला, 'हा विचार उत्तम आहे. तुह्मी पुढें जा. मीही अमळशानें येतों. काल जो आपला मित्र आला तो प्रवासामुळें फार थकला आहे, सबब त्याच्यानें इतकें दूर येववणार नाहीं. तर त्याच्याशीं थोडा वेळ गोष्टी करून मग मी येतों. त्याला एकटें टाकून यावें हें मला बरें दिसत नाहीं.' मुलें तर, घाईनें सुमार एक तासाची वाट चालून गेलीं, जसजशीं तीं पुढें जात तसतशीं नवीन वाटसरू कोणी येत आहे काय हें दुरून पाहात. फार वेळपर्यंत त्यांच्या कोणी दृष्टीस पडलें नाहीं. शेवटीं तिमथ्यस म्हणाला, 'ती पाहा एक गाडी येत आहे त्यांत कोणी एक गृहस्थ आणि एक बाई दिसत आहे. हीं जीं माणसें दिसताहेत तीं तेच असावेत.' फिलेमोन म्ह०— 'नाहींरे बाबा! कारण त्यांच्या पोषाखावरून वाटतें कीं हे हंगारी गृहस्थ असावेत.'

गाडी जवळ जवळ येऊं लागली तों एलमानबाई मोठ्यानें म्हणाली, 'ते पाहा, फिलेमोन आणि तिमथ्यस! अरे माझ्या प्रिय मुलांनो!' अबदाल्लाही त्यांस पाहून ह्मणाला 'तुह्मास पाहून मला मोठा आनंद झाला.' तेव्हां त्यानें गाडी हाकणारास हुकूम केला कीं, 'गाडी उभी कर.' अबदाल्ला एलमानबाईस म्हणाला कीं, 'आतां गांव येईपर्यंत आपण पायीं जाऊं.' तीं

उभयतां गाडींतून उतरलीं व जसें वियोगामुळें आईबाप आपल्या मुलांस आलिंगन देतात त्याप्रमाणें एलमानबाईनें आणि अबदाल्लानें त्या मुलांस आलिंगन दिलें.

अबदाल्ला म्ह०– ‘तुमचा बाप कसा आहे?’ नंतर एलमानबाई म्ह०– ‘अन्तोनियस सुखरूप येऊन पोहोंचला काय.’ मुलें ह्मणालीं, ‘होय ते खुशाल असून आनंदांत आहेत. आज संध्याकाळीं तुह्मी येणार म्हणून तुमची मार्गप्रतीक्षा आनंदानें करीत आहेत.’ तिमथ्यसानें अबदाल्लास पुसलें, ‘सुलतानानें तुमचा राजीनामा मान्य करून तुह्माला येऊं दिल्हें काय?’ अबदाल्ला ह्म०– ‘होय, राजीनामा मान्य करण्यास त्याची खुशी होती असें नाहीं. तरी मेहरबानी करून मला ख्रिस्ती देशांत जाण्याची परवानगी देऊन, मी त्याची चाकरी चांगल्या रीतीनें बजावली म्हणून माझ्या सन्मानार्थ मला त्यानें एक तलवार बक्षीस दिली.’

फिलेमोनानें एलमानबाईला विचारिलें, ‘हा सुंदर हंगारी पोषाख तुह्मी कसा मिळविला.’ ती ह्मणाली, ‘तुला आठवण नाहीं काय? ज्या उत्तम शिंप्यानें तुमच्या बापाचे कपडे तयार केले त्याला माझ्या नवऱ्यानें विकत घेतलें. नंतर दोन महिन्यांनीं मी त्याला अबदाल्लासाठीं हंगारी पोषाख तयार करण्यास सांगितलें. आमच्या मनांतून त्याला बरोबर आणावयाचें होतें. त्याला आपल्या आईबापांकडे जाण्याचें अधिक बरें वाटल्यावरून तो तिकडे गेला.’ मुलें म्हणालीं ‘तर मग इतके दूर तुम्ही दोघेच आलां काय?’ अबदाल्ला ह्मणाला ‘शूर उमर हा ख्रिस्ती होऊन आम्हांबरोबर आला आहे.’ फिलेमोनानें विचारलें कीं, ‘विश्वासू जेरीन दासी जिनें आम्हावर फार माया केली आणि आम्ही लहान असतां आम्हासाठीं जिला फार त्रास भोगावा लागला ती आतां कोठें आहे?’ एलमानबाई म्हणाली, ‘तीही आम्हाबरोबर असून ख्रिस्ती झाली आहे.’

मुलांनीं आणखी कित्येक ख्रिस्ती गुलामांविषयीं पुसलें. तेव्हां अबदाल्ला म्हणाला, ‘त्यांतून कित्येक आमच्या बरोबर आहेत त्यांच्या मनांत आमचे चाकरीस राहयाचें आहे. बाकीच्यांतून कित्येक आपल्या स्वदेशीं व कित्येक आपल्या आईबापांकडे किंवा नातलगांकडे जाण्याची परवानगी मागूं लागले; तेव्हां त्यांस आम्ही वाटखर्ची देऊन मोकळीक करून त्यांची रवानगी केली. मुलें म्हणालीं, ‘पण जीं भलीं मनुष्यें तुमच्या बरोबर आलीं तीं कोठें आहेत?’

एलमानबाई म्ह०— 'काल रात्रीं ज्या गांवीं उतरलों होतों तेथें त्यांस मागें ठेवून सांगितलें आहे कीं, तुम्हांस लिहून कळवूं तोंपर्यंत तुम्ही येथेंच राहावें. मला असा धाक पडला कीं, आम्ही जर इतकीं माणसें बरोबर घेऊन आलों तर तुमच्या बापाला त्या सर्वांस जागा पुरविण्यास कठिण पडेल. मुलें जराशीं हंसून म्हणालीं, ' त्याविषयीं कांहीं चिंता करायाची नव्हती. आमच्या घरीं पुष्कळ जागा आहे. जर तुम्ही त्यांस आणिलें असतें, तर आह्मी त्यांची सोय केली असती.'

---

## प्रकरण २२.

### सुखदायक परिणाम.

अशा प्रकारें बोलत बोलत अबदाल्ला, एलमानबाई व तीं दोन मुलें गांवाजवळ येऊन पोहोंचलीं. सीमेवर आले न आले इतक्यांत लिसीयस आणि अन्तोनियस त्यांस भेटावयास सामोरा आले. दोघांसही भेटीअंतीं वास्तविक लाभ झाला. जेव्हां ते अगदीं गांवाजवळ येऊन पोहोंचले तेव्हां लिसीयस एलमानबाईला म्हणाला, 'देवाची शांति तुह्माबरोबर या घरांत येवो व येथें सदोदित राहो. जी मोठी हवेली तुम्ही देवाच्या व ख्रीस्ताच्या प्रीतीकरितां सोडिली तिच्याशीं जर हें घर लावून पाहिलें तर हें फार लहान आणि अडचणीचें आहे. म्हणून माझी जी सर्व वतनवाडी येथें आहे ती मी सर्व तुह्मापुढें ठेविली आहे. इचें काय पाहिजे तें तुह्मी करा. खिस्ती प्रीतीनें देवाचे उपकार मानून ज्या देणग्या त्यानें आपल्याला दिल्या आहेत त्यांचा उपभोग आपण घ्यावा. मला असें वाटतें कीं, आपण सुखानें व संतोषानें येथें राहूं.' नंतर अन्तोनियस ह्मणाला जें खरें सुख ईश्वरभक्तीनें प्राप्त होईल तें संगमरवरी दगडास सोन्यानें मढविलेल्या भिंतीपासून आपणास मिळणें नाहीं.

ते सर्व घरांत गेले व जेवणाची तयारी झाली होती म्हणून लागलेच जेवायास बसले. तिमथ्यस आणि फिलेमोन म्हणूं लागले, ' आम्ही तुम्हां सर्वांच्या मागाहून जेवूं.' शेवटीं एलमानबाईच्या आग्रहास्तव ते जेवायास बसले. अबदाल्ला म्हणाला. " माझे उत्तम गुलाम ठेवीत त्यापेक्षां चांगली तरतूद येथें ठेवलेली दिसत्ये; अन्तोनियस यानें मोठ्या गांभीर्यानें आपणास जेवण झाल्यावर चार शब्द बोलण्याची परवानगी मिळावी म्हणून विनंती केली होती ती त्यास

मिळाली. नंतर जेवण संपतां संपतां तो म्हणाला, "मजविषयीं ईश्वरीसूत्र काय आहे याविषयीं मी नित्य विचार करीत असतों. आपली जी हकीगत झाली तिच्याविषयींही मी विचार केला. पहिल्यानें माझी कशी काय गोष्ट झाली त्याविषयीं मी तुम्हास सांगतों. मी ज्या वेळेस विद्याभ्यास करीत होतों त्या वेळीं मला विद्यालयाचे बागेचें काम पडलें. पण माझ्या मनांत त्यापेक्षां कांहीं तरी महत्त्वाचें काम मिळावें असें होतें. ईश्वराच्या बागेंत व प्रभूच्या द्राक्षमळ्यांत मला काम मिळावें व म्यां अधार्मिकांस खऱ्या धर्मांत आणावें अशी माझी फार इच्छा होती. शेवटीं ईश्वरानें माझा हेतु सिद्धीस नेला. हंगारी देशाचे सरहद्दीवर जेथें शुभवर्त्तमान सांगणाऱ्या उपदेशकांची फार कमताई होती तेथें मला पाठविलें; पण तुर्क लोकांनीं कैद करून मला गुलामगिरींत टाकिलें. तेव्हां माझा हिरमोड होऊन मला असें वाटलें कीं, असा विनाशकाल माझ्या आयुष्यांत मला कधींच प्राप्त झाला नाहीं. आतां मला दिसतें कीं, माळ्याचें थोडें बहुत काम पूर्वीं शिकलों होतों तेंच परिणामीं हितावह झालें. त्या कामामुळें इतर गुलामांपेक्षां लोक मजवर फार दया करीत. मला फुलझाडें व इतर झाडें चांगलीं लावितां आलीं. त्या योगानें दोन सुंदर फुलें जे दोन सुंदर लहान होतकरू रोपे म्हणजे हीं दोन मुलें तीं माझ्या स्वाधीन झालीं. माळ्याचें काम करीत असल्यामुळें माझ्याविषयीं कोणाच्या मनांत संशय न येतां माझा पाय पाच्छाचे घरांत शिरून त्यांची माझी ओळख झाली. अशाप्रकारें मी त्या सज्जन बाईचा आणि तिच्या नवऱ्याचा उपदेशक झालों. देवाचे मार्ग किती चमत्कारिक आहेत! लहान लहान साधनांनीं मोठालीं कामें कशीं करावीं हे त्यालाच ठाऊक आहे!'

'हे माझ्या प्रिय लिसीयसा, जेव्हां तुझीं प्रिय मुलें चोरीस गेलीं; तेव्हां तूं फार काळजी करून दुःख सोसलेंस. तुलाही जेव्हां कैद करून विकण्यासाठीं बाजारांत आणिलें त्या वेळीं तर तुझ्या दुःखास पारच नाहीं. त्या वेळेस तुला तसें वाटलें; पण आतां तुझी व तुझ्या मुलांची भेट झाली व गुलामगिरीच्या बेड्या जाऊन पाच्छाच्या वाड्यांत आपली एकमेकांची ओळख झाली. खरी मैत्री होऊन खऱ्या ख्रिस्ती मित्रत्वाचें जें सुंदर बंधन तें पक्कें झालें. आपण सुखानें पुष्कळ दिवस एक्या ठिकाणीं घालविले. नंतर तुजवर मोठें अरिष्ट आलें. तुला अंधारकोठडींत रहावें लागलें. तुझा वध होणार होता व तरवार तुझ्या गळ्यावर पडणार होती इतक्यांत तुझ्या मुलांच्या योगानें देवानें तुला संकटांतून पार पाडिलें. जसें तुझें दुःख भारी होतें तसाच तुझा

आनंदही भारी होता. आतांही तुझा आनंद तसाच आहे. संकट समयीं सहाय कसें करावें हें देवालाच ठाऊक आहे. जे त्याच्यावर प्रीति करितात त्याचें असेंच कल्याण होतें. माझ्या मुलांनो, तुम्हांस मी काय सांगू? तुमच्या योगानें ईश्वरानें मोठालीं कामें केलीं आहेत. त्यानें तुम्हास एकसारखें करून सारखेंच सौंदर्य दिलें आहे. त्यामुळें सर्वांचे नेत्र तुम्हाकडे लागून त्यांचें मन तुम्हावर बसतें. तुम्हाला देवानें गुलामगिरींत टाकण्यापूर्वी त्यानें मला त्या बागेंत नेलें. त्यामुळें मी तुमचा धर्मोपदेशक होऊन तुह्मांस धर्मीविषयीं जें कांहीं माहित होतें त्यापेक्षां अधिक देवाविषयीं आणि येशू ख्रिस्ताविषयीं माहिती करून दिली. देवाचाच संकेत कीं एलमानबाईस लेंकरांची फार हौस असून तिच्या पोटीं संतान नसावें. गुलामांचे व्यापारी जेव्हां तुह्मांस बाजारांत विकीत होते त्याच वेळीं एलमानबाईनें खिडकीशीं येऊन व तुमच्या रडण्यामुळें तिचे पोटांत दया उत्पन्न होऊन तिनें तुमच्या आईच्या स्थानीं व्हावें, हें सर्व ईश्वरसत्तेनेंच झालें. जेव्हां तुमच्या बापाचें डोकें उडवीत होते तेव्हां त्याच्या बरोबर मरण्यासाठीं पाच्छापाशीं अर्ज करावा ह्मणून देवानेंच तुम्हांस अपूर्व धैर्य देऊन मोठया राज्यकारभाऱ्यांचे अंतःकरणांत द्रव उत्पन्न होईल असेच शब्द तुम्हांकडून बोलविले. त्या योगानें पाच्छाचें अंतःकरण अशा मोठया तारणाकरितां तयार झालें. हें सर्व झालें ह्मणून मोठा आनंद मला झाला आहे.'

अन्तोनियसाचें अंतःकरण सद्गदित होऊन त्याच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागल्यामुळें हात जोडून तो अशी प्रार्थना करूं लागला. 'हे सर्वसमर्थ दयाळू परमेश्वरा, आकाशाच्या व पृथ्वीच्या उत्पन्नकर्त्या, त्वां आमच्या डोक्याचे सर्व केस मोजले आहेस. सर्व जगावर अधिकार करून सगळ्या गोष्टींचें सूत्र तुझ्या हातीं आहे म्हणून तुझ्या आज्ञेशिवाय एक चिमणी देखील भूमीवर पडत नाहीं. त्वांच असें ठरविलें होतेंस कीं, या दोन मुलांनीं आपल्या बापाच्या घरांतून दूर देशीं जावें. हें कृत्य त्या दुष्ट माणसाच्या युक्तीनें झालें असें नाहीं. पण तुझ्याच इच्छेनें ते तिकडेस गेले. त्या दुष्टाच्या मनांत जरी असें आलें नसतें तरी तुझा मनोरथ पूर्ण होण्यास त्याला अशी वासना झाली असती. तूं बापाचा व लेंकरांचा वियोग यासाठीं केलास कीं आह्मी सर्वांनीं तुझ्या वरच्या व ज्या येशूख्रिस्ताला आमच्या तारणासाठीं या जगांत पाठविलेंस त्यावरच्या विश्वासांत एक व्हावें. तुला सर्व गौरव व स्तुति असो. हे परमेश्वरा, आणखी आमची अशी प्रार्थना आहे कीं, आह्मी सर्वांनीं विश्वासांत, प्रीतींत व ख्रिस्ती ऐक्यांत असें टिकावें कीं, शेवटीं एका दिवशीं

आकाशांत येऊन सदोदित तुझे उपकार मानीत राहावें. आम्ही तुझेच उपकार आठवितों आणि तुला गौरव, स्तुति व सन्मान देतों.'

अशा भक्तीनें सर्वांचीं मनें सद्गदित होऊन आनंदाश्रु चालले असतां सर्वांनीं मोठ्या भाविकपणानें 'आमेन' असें ह्मटलें. त्यांचीं अंतःकरणें फार सद्गदित झालीं होतीं म्हणून ते सर्व आपापल्या खोलींत चालते झाले.

दुसऱ्या दिवशीं ते सर्व सकाळींच उठून ज्या खोलींत सूर्याचा चकचकित प्रकाश पडला होता तेथें एकत्र मिळून सकाळची प्रार्थना करून ते बागेंत फुलांचा सुवास घेण्यास व हवा खाण्यास गेले.

अबदाल्ला गांवासभोंवार चोहींकडे पाहात राहिला. हें पाहून एलमानबाई त्याला म्हणाली 'अहो अशा बारीक नजरेनें तुह्मीं काय पाहातां? तें शेतांतलें घर तुह्माला आवडतें काय?' पाच्छा ह्मणाला; 'नाहीं. ज्या जागेंत तें बांधलें आहे ती जागा मला फार आवडते.'

मग लिसीयसास त्यानें बोलावून ह्मटलें, 'माझ्या मनांतून तें घर विकत ध्यावयाचें आहे. त्यांत जो शेतकरी राहातो त्याला याहून चांगलें घर बांधतां येईल इतका खर्च मी त्याला त्याबद्दल देईन. तें घर मोडून मी तुमच्या घरासमोर नवें घर बांधीन म्हणजे तुह्मी आम्ही शेजारी होऊं. मग तुमच्या व आमच्या घरांच्या मध्यें हिरवें मैदान, फळांची बाग आणि फुलझाडांचे वाफे मात्र राहतील. माझें घर हुबेहुब तुमच्या घरासारखें होईल. जशीं तुमचीं दोन्हीं मुलें एकसारखीं आहेत, तशीं हीं दोन्हीं घरें एकसारखींच दिसतील. आपला वृद्धापकाळ झाल्यावर आपले डोळे झाकले ह्मणजे हीं दोन घरें या दोन मुलांचीं होतील आणि त्यांचीं लग्नें झाल्यावर त्यांचीं बायकामुलें यांत राहतील. तीं घरें एकसारखीं झाल्यानें त्यांची वांटणी करण्यास त्यांस अडचण न पडतां या योगानें त्याच्या शेजारधर्मांत अंतर पडणार नाहीं.'

अबदाल्लाच्या ह्मणण्याप्रमाणें लिसीयसानें तसें केलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं भोजन झाल्यावर सर्व मंडळी पाळकाच्या भेटीस गेली. पाळकानें अबदाल्लाचा व त्याच्या पत्नीचा मोठा आदरसत्कार केला. मंडळी तेथून निघाल्यानंतर अन्तोनियस मागें राहून त्या पाळकास म्हणाला, 'मला तुम्हांस दोन गोष्टी पुसायाच्या आहेत. लिसीयसाच्या घरीं फार पाव्हणे आले आहेत, तितक्यांना याच्या घरीं जागा पुरणार नाहीं. याकरितां मी जर तुमच्या घरीं राहिलों तर बरें होईल. तेव्हां माझें असें ह्मणणें आहे कीं आपण जेथें मला एकांत असेल अशी लहानशी खोली द्यावी. दुसरी माझी अशी विनंति आहे कीं, हा सज्जन

तुर्क व त्याची पत्नी व इतर पुरुष आणि बाया जे त्याच्या बरोबर आले आहेत ते सर्व ख्रिस्ती आहेत. ते उद्यां देवळांत येतील सबब त्यांच्यासाठीं उपकारस्तुति करण्याचा आपण अगोदर बंदोबस्त ठेवावा.' पाळकानें म्ह०—'ठीक आहे. जितक्या होईल तितक्या थाटानें हा समारंभ करूं. आज शनिवार व उद्यां आदितवार. वेळ फार राहिला नाहीं. तथापि होतील तितके गंभीरपणानें सर्व संस्कार करूं.'

संध्याकाळीं पुनः लिसीयसाच्या घरीं मंडळी मिळून आनंदोत्सव झाला. अबदाल्लाच्या बरोबरचे सर्व खिस्ती मित्र येऊन दाखल झाले. उमर व दुसरे दोन तुर्की पोषाक केलेले घोडेस्वार, जेरीन व दुसऱ्या हंगारी पोषाख केलेल्या अबदाल्लाच्या गाडींत बसलेल्या दासी व दोन ओझ्यांच्या गाड्या हें सर्व येऊन दाखल झालें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सर्व जण देवळांत गेले. त्या वेळीं त्या गांवचे सर्व ख्रिस्ती लोकांनीं ऐकलें होतें कीं, कोणी संभावित गृहस्थ आज देवळांत येणार आहे. म्हणून देवळाची वेळ केव्हां येईल याची वाट पाहात ते सर्व बसले होते. ते बोलूं लागले कीं, 'कोणी पाच्छा व त्याची पत्नी चाकरांसुद्धां तुर्की असून खिस्ती झालीं हें नवल होय.'

एलमानबाई देवळांत आल्यावर कांहीं वेळपर्यंत तटस्थ उभी राहिली. तिच्या नगरांत पोथीसाठीं जी जागा तयार केली होती त्यावांचून तिला देऊळ कसें असतें हें माहीत नव्हतें. लिसीयस तिला म्हणाला; सर्व ख्रिस्ती देशांत अशींच देवळें असतात व मोठाल्या शहरांत जीं असतात त्यांस "काथिल" म्हणतात. तीं याहून फार सुंदर व मोठीं असतात.

पाळकानें अबदाल्ला व एलमानबाई व लिसीयस यांस जी जागा त्यांच्याकरितां तयार केली होती तेथें आणून बसविलें. पोथी होतेसमयीं अबदाल्ला, त्याची पत्नी व इतर आलेले सर्व ख्रिस्ती भक्त देवाचे उपकार मानण्यांत फार गढून गेले होते. शेवटीं पाळकानें "हे देवा तुझी आम्ही स्तुति करितों" ह्या गीतास आरंभ केला आणि सर्व मंडळी हें पुरातन कालचें गीत त्याच्या बरोबर मोठ्या प्रेमानें गाऊं लागली.

सर्व आटोपल्यावर ते देवळांतून जाऊं लागले तेव्हां अबदाल्ला म्हणाला, 'राहिलेल्या सर्व आयुष्यभर "हे देवा आम्ही तुझी स्तुति करितों" असें गीत गावें व तें गात असतां आमचा सर्वांचा शेवट व्हावा.'

# शुद्धिपत्र.

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २ | ३ | लुसियस | लिसीयस असें सर्व जागीं वाचावें. |
| ६ | ३० | त्यां | त्यांस. |
| १२ | ७ | अन्तोनियो | अन्तोनियस. |
| १३ | २४ | त्याची | त्यांची. |
| १६ | १८ | अन्तोनियो | अन्तोनियस. |
| १८ | १ | बागांत | गांवांत. |
| ३४ | ३ | त्याच्या | त्यांच्या. |
| ” | २९ | त्याच्या | त्यांच्या. |
| ४६ | १० | परमेश्वर | परमेश्वरा. |
| ५७ | २३. | त्यांची | त्याची. |
| ६६ | ३१ | वश्वासांत | विश्वासांत. |
| ६८ | २० | काथील | काथिद्रल. |